।। जय जय रघुवीर समर्थ ।।

# ।। हे शब्दरत्नाचे सागर ।।

## श्रीमत् दासबोध – शब्द – ओवी सूची

संकलन आणि संपादन

सौ. अंजली शशिकांत कुसूरकर

श्री. आदेश वसंत अत्रे

अद्वैत पब्लिकेशन्स्
बिल्डींग नं. ८, फ्लॅट नं. ६, आनंद पार्क सोसायटी, शंकरशेट रस्ता, पुणे ४११ ०३७.
दूरध्वनी : ०२०–२६४५७९६६ – www.advaitgroup.com - publications@advaitgroup.com
अधिक माहितीसाठी संपर्क: श्री. आदेश वसंत अत्रे – ९९२१३४५९५५

# ।। हे शब्दरत्नाचे सागर ।।





अद्वैत पब्लिकेशन्स् , पुणे. दूरध्वनी : ०२०-२६४५७९६६



## ।। श्री रामचंद्राची आरती ।।

साफल्या निजवल्या कौसल्यामाता ।
भूकन्या अनन्या मुनिमान्या सीता ।।
खेचर वनचर फणिवर भरता निजभ्राता ।
दशरथ नृपनायेक धन्य तो पिता
जयदेव जयदेव जय रविकुळटिळका ।
आरती ओवाळू त्रिभुवननायेका
आचार्या गुरुवर्या कार्याचें फळ ।
रूसिकुळमंडण खंडण संसारमूळ ।।
सुरवर मुनिवर किन्नर ध्याती सकळ ।
धन्य तो निजदास भक्त प्रेमळ



## ।। आरती श्री समर्थांची ।।

आरती रामदासा । सद्गुरू सर्वेशा । कायावाचा मनोभावें । वोवाळूं परेशा ।।१।।
रामदास मूर्तिमंत । रामचंद्र अवतार । कलियुगीं अवतरोनी । केला भक्तांचा उद्धार ।।२।।
वैराग्य भक्ति ज्ञान । शांति क्षमा विरक्ती । विवेक सालंकृत । क्षमा दया सर्वभूतीं ।।३।।
सच्चिदानंदघन । रामदास केवळ । दिनकरकृपायोगें । 'रामचंद्र' निर्मळ ।।४।।

।। श्री रामचंद्रार्पणमस्तु ।।
।। जय जय रघुवीर समर्थ ।।

## ।। आरती दासबोधाची ।।

वेदांतसंमतीचा काव्यसिंधु भरला । श्रुति शास्त्रग्रन्थ गीता साक्ष संगम केला ।
महानुभाव संतजनीं अनुभव चाखीला । अज्ञान जड जीवा मार्ग सुगम जाला ।।१।।
जय जया दासबोधा ग्रन्थराज प्रसिध्दा । आरति वोवाळीन विमळज्ञान बाळबोध ।।धृ।।
नवविधा भक्तिपंथें रामरूप अनुभवी । चातुर्यनिधी मोठा मायाचक्र उगवी ।
हरिहरहृदयींचें गुह्य प्रगट दावी । बद्धचि सिद्ध जाले असंख्यात मानवी ।।२।।
वीसहि दशकींचा अनुभव जो पाहे । नित्यनेम विवरितां स्वयें ब्रह्मचि होये ।
अपार पुण्य गांठी तरी श्रवण लाहे । 'कल्याण' लेखकाचें भावगर्भ हृदईं ।।३।।

# प्रस्तावना....

श्री.समीर शशिकांत कुसूरकर यांच्या मातोश्री सौ. अंजली शशिकांत कुसूरकर आणि श्री. आदेश वसंत अत्रे यांनी श्रीमद् दासबोधाची शब्दसूची आणि ओवीसूची याची सी.डी. तयार केली. श्रीमद् दासबोधामध्ये ७७५१ ओव्या आहेत तर सुमारे ९०००० शब्द आहेत. फार पूर्वी दिल्ली येथील कै. द.वा. पंडितराव यांनी दासबोधाची शब्दसूची तयार केली होती. त्यावेळी संगणक उपलब्ध नसल्यामुळे कार्डशीटवर शब्द आणि त्याचा पत्ता लिहून रबरबँडने त्याचे गठ्ठे त्यांनी बांधून ठेवले होते. त्याची तीन खोकी तयार झाली होती. काळाच्या ओघात ती नष्ट झाली. आता सुदैवाने सौ. अंजली कुसूरकर आणि श्री. आदेश अत्रे यांच्या मेहेनतीला श्री. समीर कुसूरकर यांनी सी.डी. च्या रुपता संकलित केल्यामुळे दासबोधाच्या अभ्यासकांसाठी एक नवे दालन खुले झाले आहे. याबद्दल हे तिघेजण अभिनंदनास पात्र तर आहेतच पण त्याचबरोबर महाराष्ट्रावर त्यांचे मोठे ऋण आहे. आता एखाद्या ओवीतील एक जरी शब्द आठवत असेल तर या सी.डी.च्या आधारे ती ओवी शोधून काढणे शक्य आहे.

हे काम किती कष्टाचे तसेच चिकाटीचे आहे याची आपण कल्पना करू शकतो. या सी.डी.ला व्यापारी स्वरूप न देता केवळ अभ्यासकांना उपलब्ध करून देणे ही त्यांची वृत्तीदेखील प्रशंसनीय आहे. दासबोधाचे तरूण अभ्यासक या शब्दसूचीवरुन दासबोधाची चांगली विषयसूची तयार करू शकतील. ज्या वृध्द समर्थभक्तांना संगणकाचा संस्कार नाही ते मुलांच्या आणि नातवंडांच्या मदतीने या सी.डी. चा लाभ घेऊ शकतील. सौ. अंजलीताई आणि श्री. अत्रे यांना अशा आध्यात्मिक सेवेसाठी परमेश्वराने उदंड आयुष्य आणि निरामय आरोग्य द्यावे ही समर्थचरणी प्रार्थना. 'हे शब्दरत्नाचे सागर' यथार्थ मथळा या शब्दसूचीला दिला गेला आहे. समर्थ सांप्रदायिकांनी याचा अवश्य लाभ घ्यावा.

''जेही उदंड कष्ट केले । ते भाग्य भोगूनी ठेले ।।'' या उक्तीनुसार या तिघांच्या वाट्याला भौतिक आणि आध्यात्मिक सद्‌भाग्य निश्चित येईल.

श्री. सुनिल चिंचोलकर,
'अजिंक्यनगर', हिंगणे खुर्द, सिंहगड रोड, पुणे - ५१.
मोबा.: ९४२३७४२४४४

**********

# ।। भूमिका ।।

दासबोधश्चिदादित्यो यत्र कुत्रापि वा स्थित: ।
अज्ञानतिमिरं शीघ्रं नाशयन् काशतेऽनिशम् ।।

– प.प. श्रीधरस्वामीकृत श्रीमद्दासबोधतत्त्वस्तव

चैतन्यसूर्यासारखा दासबोध कोणाकडेही असला तरी अज्ञानांधकार तत्काळ नाश पावून त्याच्या अंतरात अखंड ज्ञानप्रकाश राहील.

सत्पुरुषांचे कार्य अलौकिक असते. बहुतेक वेळा आपण फक्त वाच्यार्थाचाच आधार घेतो आणि त्यातील लक्ष्यांश आपल्या लक्षातच येत नाही. श्रीधरस्वामींनी दासबोधाच्या स्तवनात म्हटले आहे की ग्रंथ आपल्या जवळ असला तरी आपल्याला ज्ञानप्राप्ती होते. हा झाला या स्तवनाचा वाच्यांश पण लक्ष्यांश म्हणजे

जयास जोडला परमार्थ। तेणें पाहावा हा ग्रंथ ।अर्थ शोधितां परमार्थ। निश्चयें बाणे ।। ०७.०१.०३० ।।

म्हणजेच ग्रंथ जवळ असणे ही पहिली पायरी, पारायण करणे दुसरी पायरी, ग्रंथाचे वाचन, श्रवण करणे तिसरी पायरी, श्रवणानंतर मनन निदिध्यासन करणे ही चवथी पायरी आणि विवेकाने, निश्चयाने, सद्गुरुकृपेने प्रत्यय घेणे ही पाचवी पायरी.

श्रवण मनन निजध्यास। प्रचितीनें बाणतां विश्वास ।रोकडा साक्षात्कार सायास। करणेंचि नलगे ।। १०.०९.०३० ।। किंवा
श्रवणापरीस मनन सार। मननें कळे सारासार ।निजध्यासें साक्षात्कार। निःसंग वस्तु ।। ११.०१.०४१ ।।

अशा प्रकारच्या श्रवण, मनन, निदिध्यासनावर भर देणाऱ्या ओव्या दासबोधात सर्वत्र विखुरलेल्या आहेत. त्याचप्रमाणे समर्थांनी परब्रह्म, माया, परमात्मा, गुरुकृपा, विवेक, उपासना, अनुमान, प्रत्यय, प्रचिती, प्रपंच, परमार्थ अशा विविध विषयांवर विविध समासांत सखोल चर्चा केली आहे आणि ही चर्चा वेळोवेळी करण्याचे कारणही सांगितले आहे. ते म्हणजे श्रोत्यांना समाधानाची प्राप्ती व्हावी.

कर्म केलेंचि करावें। ध्यान धरिलेंचि धरावें ।विवरलेंचि विवरावें। पुन्हा निरूपण ।। ११.०५.००१ ।।
तैसें आम्हांस घडलें। बोलिलेंचि बोलणें पडिलें ।कां जें बिघडलेंचि घडलें। पाहिजे समाधान ।। ११.०५.००२ ।।

याच्या उदाहरणादाखल वरील काही विषयांच्या विविध समासातील ओव्या खाली देत आहे.त्यावरुन समर्थांची विषय हाताळण्याची पद्धतही लक्षात येईल.

परब्रह्म/माया/अंतरात्मा:

तैसें मायेकरितां निर्गुण। वाटे जालें सगुण ।परी तें पाहतां संपूर्ण। जैसें तैसें ।। ०८.०३.०३८ ।।
आभाळ आलें आणि गेलें। तरी गगन तें संचलें ।तैसें गुणा नाहीं आलें। निर्गुण ब्रह्म ।। ०८.०३.०३९ ।।
तैसें ब्रह्म निर्विकार। निर्विकारीं लाविती विकार ।विकार नासे निर्विकार। जैसें तैसें ।। १०.०४.०१४ ।।
परब्रह्म असतचि असे। मध्येंचि हा भ्रम भासे ।भासे परंतु अवघा नासे। काळांतरीं ।। १०.०६.००३ ।।
निश्चळ परब्रह्म येक। चंचळ जाणावें माईक ।ऐसा प्रत्यय निश्चयात्मक। विवेकें पाहावा ।। १०.१०.०४९ ।।
ब्रह्म म्हणिजे निश्चळ। अंतरात्मा तो चंचळ ।द्रष्टा साक्षी केवळ। बोलिजे तया ।। ११.०४.००२ ।।
नाना विकाराचें मूळ। ते हे मूळमायाच केवळ ।अचंचळीं जे चंचळ। सूक्ष्मरूपें ।। १५.०७.००१ ।।

अनुमान/प्रत्यय/प्रचिती:

येथें प्रचित हें प्रमाण। नलगे शास्त्राचा अनुमान ।अथवा शास्त्रीं तरी पाहोन। प्रत्ययो आणावा ।। ०९.०५.०१४ ।।
जितुकें अनुमानाचें बोलणें। तितुकें वमनप्राये त्यागणें ।निश्चयात्मक तेंचि बोलणें। प्रत्ययाचें ।। ०९.०५.०३९ ।।
प्रत्यक्षास आणी प्रमाण। निश्चयास आणि अनुमान ।मार्ग देखोन आडरान। घेऊंच नये ।। १०.०४.००३ ।।
नव्हे अनुमानाचें बोलणें। याचा बरा प्रत्यये घेणें ।वेदशास्त्रें पुराणें। प्रत्ययें घ्यावीं ।। १३.०३.०१७ ।।
या प्रचितीच्या गोष्टी। प्रचित पाहावी आत्मदृष्टीं ।प्रचितीवेगळे कष्टी। होऊंच नये ।। १०.१०.०६७ ।।
विवेकप्रत्ययाचीं कामें। कैसीं घडतील अनुमानभ्रमें ।सारासारविचाराचेन संभ्रमें। पाविजे ब्रह्म ।। १२.०६.०२५ ।।
बहुतांचे बोलीं लागलें। तें प्राणी अनुमानीं बुडाले ।मुख्य निश्चये चुकलें। प्रत्ययाचा ।। १५.०६.०१० ।।
उदंडाचें उदंड ऐकावें। परी तें प्रत्ययें पाहावें ।खरेंखोटें निवडावें। अंतर्यामीं ।। १५.०६.०११ ।।

गुरुकृपा/सत्समागम:

सकळ माया गथागोवी। संतसंगें हे उगवावी ।पाविजे मोक्षाची पदवी। सत्समागमें ।। ०८.०५.०७० ।।
परब्रह्म म्हणिजे सकळांपरतें। तयास पाहातां आपणचि तें ।हें कळे अनुभवमतें। सद्गुरु केलियां ।। ०९.०१.०२९ ।।
जें नेणवे पुराणीं। जेथें सिणल्या वेदवाणी ।तेंचि आतां येचि क्षणीं। बोधीन गुरुकृपें ।। ०५.०६.०३२ ।।
न करितां वेदाभ्यास। अथवा श्रवणसायास ।प्रेत्नेंविण सौरस। सद्गुरुकृपा ।। ०५.०६.०३५ ।।
येक गुरु येक देव। कोठें तरी असावा भाव ।भावार्थ नस्तां वाव। सर्व कांहीं ।। १०.०७.०१५ ।।
ज्ञानेविण कर्म विघडे। हें तों कदापि न घडे ।सद्गुरुवीण ज्ञान जोडे। हेंहि अघटीत ।। १०.०९.०२४ ।।
म्हणोन सद्गुरु करावा। सत्संग शोधून धरावा ।तत्वविचार विवरावा। अंतर्यामीं ।। १०.०९.०२५ ।।
पुस्तकज्ञानें निश्चये धरणें। तरी गुरु कासया करणें ।याकारणें विवरणें। आपुल्या प्रत्ययें ।। १२.०६.०३० ।।

प्रपंच/परमार्थ:

प्रपंच करावा नेमक। पाहावा परमार्थविवेक ।जेणेंकरितां उभय लोक। संतुष्ट होती ।। ११.०३.००२ ।।
प्रपंचसमयो वोळखावा। धीर बहुत असावा ।संमंध पडों नेदावा। अति परी तयाचा ।। ११.०५.००८ ।।
आधीं प्रपंच करावा नेटका। मग घ्यावें परमार्थविवेका ।येथें आळस करूं नका। विवेकी हो ।। १२.०१.००१ ।।
परमार्थ सांडून प्रपंच करिसी। तरी तूं येमयातना भोगिसी ।अंतीं परम कष्टी होसी। येमयातना भोगितां ।। १२.०१.००४ ।।
प्रपंचीं असोन परमार्थ पाहे। तोहि ये स्थितीतें लाहे ।प्रारब्धयोगें करून राहे। लोकांमधें ।। १२.०८.०२१ ।।
म्हणौन सावधानपणें। प्रपंच परमार्थ चालवणें ।ऐसें न करितां भोगणें। नाना दुःखें ।। १२.०१.०१० ।।

तत्वज्ञान एकच असले तरी सर्वच संतांची ते तत्वज्ञान मांडायची पध्दत मात्र भिन्न दिसते. त्यातून कधी कधी तत्वप्राप्तीपर्यंत जाताना भिन्नता प्रचितीस येते अथवा ‘एकोहं बहुस्याम्’ प्रमाणेच त्या एका तत्वाचेच विविध पैलू विविध संतांना विविध प्रकारे जाणवतात काय असे बरेचदा वाटते.

संतसाहित्याच्या अभ्यासातून ही ओव्यांची, अर्थाची विविधता सहजच लक्षात येते आणि हीच गोष्ट प्रत्येक संतसाहित्याला एक वेगळे वैशिष्ट्य किंवा अलौकिकत्व देते. अनुभूती एकाच परतत्त्वाची असल्याने त्यात श्रेष्ठ कनिष्ठ हा भेदच उद्भवत नाही पण यातून विविधतेतून एकता जाणवते आणि याच विविधतेतून हा चिद्विलास पाहण्यात एक अलौकिक आनंदाची प्राप्ती निश्चितच होते.

दासबोधाचा अभ्यास करताना समर्थांच्या प्रतिभेची जाणीव होते व त्यातून ते लग्नमंडपात ‘सावधान’ झाल्यावर, तपश्चर्येनंतर प्राप्त झालेल्या आत्मानंदातून समाजाभिमुख कसे होतात हे दृष्टिपथात येते. प्रप्रंच नेटका केला पाहिजे पण परमार्थ हा कसा महत्त्वाचा आहे, मनुष्य जन्म कसा अलौकिक आहे, आळस सोडून प्रत्येकाने कसा अचूक प्रयत्न केला पाहिजे, अनुमानापेक्षा प्रचिति, अनुभवाचे काय महत्व आहे, विवेकाने चंचल काय आणि निश्चल काय याचा विचार आपण कसा केला पाहिजे अशा बऱ्याच विषयांवर समर्थांनी श्रोता व वक्ता या माध्यमातून समाज जागृतीचे काम केले आहे. आणि आजही ते विचार कसे मौल्यवान व उपयुक्त आहेत हे आपल्याला पदोपदी जाणवते.

दासबोधाच्या अभ्यासाने निश्चितच समाधानाची प्राप्ती होते असा समर्थ जो आग्रह धरतात हे ज्याचे त्याने दासबोधाचा अभ्यास करुन स्वत: अनुभव घ्यावा म्हणजे कळेल.

ऐसी याची फळश्रुती। श्रवणें चुके अधोगती ।मनास होय विश्रांती। समाधान ।। ०१.०१.०३७ ।।

दासबोधाच्या भक्तिसागरात विहार करताना जे प्रेमतरंग विकसित होतात त्याची काही वैशिष्ट्यपूर्ण उदाहरणे पुढे दिल्याशिवाय राहवत नाही.

**ग्रंथ :** पूर्वग्रहदूषित होऊन बहुतेकवेळा ग्रंथाचे अवलोकन न करता, त्याचा अभ्यास न करता काही लोक ग्रंथाला नावे ठेवतात, त्यांना समर्थ आपल्या शैलीत सांगतात,

पूर्ण ग्रंथ पाहिल्याविण। उगाच ठेवी जो दूषण ।तो दुरात्मा दुराभिमान। मत्सरें करी ।। ०१.०१.०२२ ।। किंवा
थांबा थांबा  ऐका ऐका। आधींच  ग्रंथ सोडूं नका ।सांगितलें तें ऐका। सावधपणें ।। १७.०३.००१ ।।

कोणता ग्रंथ श्रेष्ठ हेही सांगतात

म्हणोनि नित्यानित्यविचार। जेथें बोलिला सारासार ।तोचि ग्रंथ पैलपार। पाववी विवेकें ।। ०७.०९.०६० ।।

आणि हे जर तुम्हाला या ग्रंथात मिळत नसेल तर समर्थ म्हणतात,

करून अवघा तत्वझाडा। सारासाराचा निवाडा ।सावधपणें ग्रन्थ सोडा। सुखिनावें ।। १७.०३.०३० ।।

पण ग्रंथात हे सर्व असूनही तुम्ही नावे ठेवणार असाल तर समर्थ हे बजावतात की

आतां असो हें बोलणें। अधिकारासारिखें घेणें ।परंतु अभिमान त्यागणें। हें उत्तमोत्तम ।। ०१.०१.०२६ ।। किंवा
जयाचा भावार्थ जैसा। तयास लाभ तैसा ।मत्सर धरी जो पुंसा। तयास तेंचि प्राप्त ।। ०१.०१.०३८ ।।

आणि ज्याची बुद्धि बहिर्मुख आहे त्यास समर्थ उपदेश करतात की,

जयाचें चंचळ हृदये। तेणें ग्रंथ सोडूं चि नये ।सोडितां अलभ्य होये। अर्थ येथीचा ।। ०७.०१.०२९ ।।

**भाषा:** भाषेचा दुराभिमान आणि अर्थाकडे दुर्लक्ष करणाऱ्यांना सुद्धा समर्थांनी उपदेश केला आहे.

तैसी भाषा प्राकृत। अर्थ वेदांत आणि सिद्धांत ।नेणोनि त्यागी भ्रांत। मंदबुद्धिस्तव ।। ०७.०१.०३४ ।। किंवा
अर्थ सार भाषा पोचट। अभिमानें करावी खटपट ।नाना अहंतेनें वाट। रुधिली मोक्षाची ।। ०७.०१.०४४ ।।
शोध घेतां लक्ष्यांशाचा। तेथें आधीं वाच्यांश कैंचा ।अगाध महिमा भगवंताचा। कळला पाहिजे ।। ०७.०१.०४५ ।।
मुकेपणाचें बोलणें। हें जयाचें तोचि जाणें ।स्वानुभवाचिये खुणे। स्वानुभवी पाहिजे ।। ०७.०१.०४६ ।।

**कर्ता:** आपण कर्ता नाही पण मग कोण कर्ता आहे याबद्दल समर्थांचे विचार पाहून त्यातील सखोलता लक्षात येते.

कर्ता आपण ऐसे म्हणावें। तरी आपलें इछेसारिखें व्हावें ।इछेसारिखें न होतां मानावें। अवघेंच वाव ।। १३.०६.०२६ ।।
म्हणोन कर्ता नव्हे किं आपण। तेथें भोक्ता कैंचा कोण ।हें विचाराचें लक्षण। अविचारें न घडे ।। १३.०६.०२७ ।। आणि
पंचभूतांवेगळें निर्गुण। तेथें नाहीं कर्तेपण ।निर्विकारास विकार कोण। लाऊं शके ।। १३.०८.०२९ ।।
निर्गुणास कर्तव्य न घडे। सगुण जाल्यांत सांपडे ।आतां कर्तव्यता कोणेकडे। बरें पाहा ।। १३.०८.०३० ।।
लटिक्याचा कर्ता कोण। हें पुसणेंचि अप्रमाण ।म्हणोनि हेंचि प्रमाण। जें स्वभावेंचि जालें ।। १३.०८.०३१ ।।

**कवित्व:** कवित्व म्हणजे काय आहे आणि काय नाही त्याचे विवरण समर्थांनी केले आहे ते म्हणतात,

जेणें सद्वस्तु भासे। जेणें भास हा निरसे ।जेणें भिन्नत्व नासे। या नाव कवित्व ।। १४.०३.०५२ ।।

**उपासना :** उपासना द्वैत प्रकट करत असल्याने ती कुठपर्यंत असते ह्याचे वर्णन समर्थ करतात,

महत्तत्त्व महद्भूत। तोचि जाणावा भगवंत ।उपासना हे समाप्त। येथून जाली ।। १५.०५.०३१ ।।
मी तूं हा भ्रम। उपासनाहि भ्रम ।ईश्वरभाव हाहि भ्रम। निश्चयेंसीं ।। १०.०६.०११ ।।

**पाप/पुण्य :** पाप काय आणि पुण्य काय याबद्दल समर्थ म्हणतात

दृश्य पाप वोसरलें। पुण्य परब्रह्म उरलें ।अनन्य होतांच जालें। नामातीत ।। १०.१०.०५६ ।।

**मौन/तद्रुपता :** जेथे द्वैतसुद्धा शिल्लक राहत नाही तेथे कोण कोणाबद्दल काय बोलणार, समर्थ म्हणतात

जेथें सर्व हि अशेष जालें। तेथें विशेष कैंचें आलें ।मी मौनी म्हणतां भंगलें। मौन्य जैसें ।। ०९.०२.०४० ।। किंवा
त्यास न भेटतां होये भेटी। भेटों जातां पडे तुटी ।ऐसी हे नवल गोष्टी। मुकेपणाची ।। ०७.०७.०२१ ।। किंवा
पाहातां पाहातां अनुमानलें। कळतां कळतां कळों आलें ।पाहातां अवघेंचि निवांत जालें। बोलणें आतां ।। १२.०५.०२२ ।। किंवा
जाणतां जाणतां जाणीव जाते। आपली वृत्ति तद्रूप होते ।आत्मनिवेदन भक्ति ते। ऐसी आहे ।। १३.०२.०२८ ।।
वाच्यांशें भक्ति मुक्ति बोलावी। लक्ष्यांशें तद्रूपता विवरावी ।विवरतां हेतु नुरावी। ते तद्रूपता ।। १३.०२.०२९ ।।

**आकाश:** समर्थ परब्रह्मासाठी आकाशाचा दृष्टांत देतात पण आकाश ही शून्य स्थिती किंवा अज्ञान दर्शवित असल्याने  हा दृष्टांत सुद्धा अपुरा आहे असे मांडतात.

आकाश अनुभवा येतें। स्वरूप अनुभवापरतें ।म्हणोनियां आकाशातें। साम्यता न घडे ।। ०८.०५.०६८ ।।

**अनन्य:** अन्य अशी भावनांच, वृत्तीत उरत नाही, तीच खरी अनन्यता समर्थ म्हणतात,

निर्गुणाचें कैसें भजन। निर्गुणीं असावें अनन्य ।अनन्य होतां होईजे धन्य। निश्चयेंसीं ।। ०९.१०.०१२ ।। किंवा
म्हणौनि थोराहूनि थोर। जे ईश्वराचा ईश्वर ।तयेसी माझा नमस्कार। तदांशेंचि आतां ।। ०१.०३.०२६ ।।

**विवेक:** मनुष्याने विवेक कसा वापरावा व त्यायोगे प्रपंच व परमार्थ यांची सांगड कशी घालावी हे समर्थ वेळोवेळी स्पष्ट करतात

आत्मानात्माविवेक पिंडीं। सारासारविचार ब्रह्मांडीं ।विवरविवरों हे गोडी। घेतली पाहिजे ।। १४.०९.००३ ।।

विवेकाने कशाचा त्याग करावा याबद्दल समर्थ सांगतात

सबळ विषय त्यागणें। शुद्ध कार्याकारण घेणें ।विषयत्यागाचीं लक्षणें। वोळखा ऐसीं ।। १२.०७.०२७ ।। किंवा
त्यागात्याग तार्किक जाणे। बोलाऐसें चालों जाणे ।पिंडब्रह्मांड सकळ जाणे। येथायोग्य ।। १२.०७.०३० ।।
ऐसा जो सर्वजाणता। उत्तमलक्षणी पुरुता ।तयाचेनि सार्थकता। सहजचि होये ।। १२.०७.०३१ ।।

**सफलता:** जीवनात सफल व्हायचे असेल तर समर्थ सांगतात

वेवसाये प्रवृत्ती निवृत्ती। दोहिंकडे पाहिजे प्रचिती ।प्रचितीविण अनुमानें असती। ते विवेकहीन ।। १३.०३.०१९ ।। किंवा
अंतरीं नाहीं सावधानता। येत्न ठाकेना पुरता ।सुखसंतोषाची वार्ता। तेथें कैंची ।। १२.०९.००७ ।।
म्हणोन आळस सोडावा। येत्न साक्षेपें जोडावा ।दुश्चितपणाचा मोडावा। थारा बळें ।। १२.०९.००८ ।। किंवा
हाट भरला संसाराचा। नफा पाहावा देवाचा ।तरीच या कष्टाचा। परियाये होतो ।। १२.०८.०३४ ।।

अशा प्रकारे भरपूर विषय व उदाहरणे देता येतील, पण इथे थांबणेच आता योग्य वाटते.

शतकानुशतके दासबोधाचा अभ्यास करून आजवर कित्येकांनी अत्युच्च स्थिती प्राप्त करून घेतली आहे. माझ्या बाबतीत म्हणायचे तर मी एक सामान्य व्यक्ती आहे आणि जीवन सार्थकी करण्याचा प्रामाणिक प्रयत्न करीत आहे. मी नम्रतेने एवढेच सांगते –

आपुला काळ सार्थक केला। रघुनाथकीर्तीमधें बुडाला ।भूमंडळीं उधरिला। बहुत लोक ।। १६.०१.०२० ।।
रघुनाथभक्त थोर थोर। महिमा जयांचा अपार ।त्या समस्तांचा किंकर। रामदास म्हणे ।। १६.०१.०२१ ।।

दासबोधाचा अभ्यास करायची बुद्धी मला माझ्या महाविद्यालयीन जीवनातच झाली आणि त्यानंतर पुढे मी दासबोधाची परीक्षा सुद्धा दिली. दासबोधाचा अभ्यास करण्याची, त्यावर चिंतन करण्याची संधी मी दवडत नाही आणि आज योगायोगाने दासबोधाची ‘शब्द ओवी सूचि’ करण्याच्या कार्यात मी योगदान करु शकते हे माझे भाग्यच समजते.

माझे व्याही कै. श्री. पद्‌माकर विठ्ठल कुलकर्णी व त्यांचे सुहृद श्री. आदेश वसंत अत्रे यांनी ज्ञानेश्वरी शब्द ओवी सूची, तुकाराम गाथा शब्द अभंग सूची, चतुरंगी ज्ञानेश्वरी असे विविध प्रकल्प त्यांच्या अन्य सहकाऱ्यांबरोबर केले आणि मला त्यातून दासबोधाची अशा प्रकारची सूची करण्याची प्रेरणा मिळाली. आजपर्यंत जो काही मी दासबोधाचा अभ्यास करण्याचा प्रयत्न केला त्याचे फल म्हणूनच आज मी या प्रकल्पात सहभागी आहे असे मला मनापासून वाटते.

श्री. सुनीलजी चिंचोलकर या समर्थ परिवारातील अधिकारी व्यक्तिकडून या प्रकल्पाला प्रस्तावना मिळाली हे आमचे महद्‌भाग्य आहे, आणि त्यामुळे आम्हाला मोठा उत्साह आणि प्रोत्साहन मिळाले आहे.

दासबोधाव्यतिरिक्त समर्थांचे अफाट वाङ्मय आहे आणि त्यात मनाचे श्लोक, आत्माराम, जुना दासबोध, स्फुट प्रकरणे, लघुकाव्ये, प्रासंगिक प्रकरणे, आरत्या, अभंग वगैरेंचा समावेश आहे. समाजात दासबोध किंवा मनाच्या श्लोकांएवढे इतर समर्थ वाङ्मयाला महत्व प्राप्त झालेले दिसत नाही. या दृष्टीने या इतर वाङ्मयाचे संपूर्ण संकलन आणि संपादन करून त्याची सुद्धा सूची करुन ती सीडी स्वरुपात सर्वांसाठी उपलब्ध करायचा पुढील मानस आहे कोणाला या कामात मार्गदर्शन किंवा सहकार्य करण्यात स्वारस्य असेल त्यांनी आमच्याशी जरून संपर्क साधावा.

तसेच समर्थांच्या साहित्यावर पी.एच्.डी. करण्याचाही माझा मनोदय आहे ज्यायोगे एका विशिष्ट पध्दतीने वाङ्मयाकडे बघण्याची दृष्टी प्राप्त होते आणि समाजापुढे विविध विषय समाजाभिमुख पध्दतीने मांडता येतो. अशी संधी मला प्राप्त झाली आणि योग्य मार्गदर्शन मिळाले तर मला समर्थ वाङ्मयाची पुढील अनेक वर्षे सेवा करण्याचे भाग्य प्राप्त होईल असो...

मागे उल्लेख केल्याप्रमाणे विविध विषयांवरील चर्चा ही दासबोधात विखुरली आहे, आणि त्याचा सर्वांगीण अभ्यास करण्याच्या दृष्टीने या सूचीचा सर्व अभ्यासकांना उपयोग होईल यात शंका नाही.

दासबोधात सुमारे ९०,००० शब्द आहेत आणि आम्ही ते आकारविल्ह्यानुसार मांडले असून प्रत्येक शब्दासमोर त्याचा ओवी क्रमांक जसे (०१.०१.००१) म्हणजे दशक क्रमांक, समास क्रमांक आणि ओवी क्रमांक या पद्धतीने मांडला आहे. तसेच त्या प्रत्येक शब्दासमोर ती संपूर्ण ओवीसुद्धा दिली आहे. यामुळे एखादा शब्द दासबोधात किती वेळा कोणत्या दशकात, समासात आला हे पटकन कळेल आणि त्या सर्व ओव्या एकाच ठिकाणी बघता येतील. ही सूची सी.डी. स्वरुपात उपलब्ध केली आहे कारण यात सुमारे ४००० पाने आहेत व ती पुस्तकरुपाने प्रकाशित करणे आज तरी अशक्य आहे. शिवाय सी.डी. हे आजच्या युगाचे प्रभावी माध्यम असून तरुण वर्गाला दासबोधासारख्या अलौकिक वाङ्मयाचा अभ्यास करण्यास प्रवृत्त करण्यासाठी याचा उपयोग होईल अशी आशा वाटते.

या प्रकल्पाचे काम करताना आम्हाला विविध अंगांनी दासबोधाचा अभ्यास करायला उपयोग झालाच आणि दररोज होतच आहे पण तुम्हाला सुध्दा याचा उपयोग होईल आणि तुम्ही तो करुन घ्यावा अशी प्रार्थना आहे.

आपण आवचितें मरोन जावें। मग भजन कोणें करावें ।याकारणें भजनास लावावे। बहुत लोक ।। १२.१०.०३३ ।।

या समर्थांच्या उक्तीप्रमाणे आम्ही आमचे प्रयत्न प्रामाणिकपणे चालू ठेवणार आहोत.

असेच समर्थ वाङ्मयाचे कार्य शेवटपर्यंत आमच्या हातून घडो ही समर्थचरणी प्रार्थना.

समर्थाचा पुत्र मूर्ख जगीं। परी सामर्थ्य असे त्याचा आंगीं ।तुम्हां संतांचा सलगी। म्हणौनि करितो ।। ०१.०६.०१८ ।।

आमचा हा प्रयत्न आम्ही तुमच्यापुढे मांडत आहोत पण जर काही कमीजास्त झाले असेल तर तुम्ही आम्हाला क्षमा कराल यात शंका नाही कारण

आपलेंचि बोले वाउगें। त्याची संपादणी करणें लागे ।परंतु कांहीं सांगणें नलगे। न्यून तें पूर्ण करावें ।। ०१.०६.०२१ ।।
हें तों प्रीतीचें लक्षण। स्वभावेंचि करी मन ।तैसे तुम्ही संतसज्जन। मायेबाप विश्वाचे ।। ०१.०६.०२२ ।।

समर्थांच्या चरणी हा प्रकल्प अर्पण करुन आम्ही त्यांना साष्टांग दंडवत घालतो.

स्तवावा मनी की गुरु रामदास । कृपे या जयाच्या तुटे मोहपाश ।
निजानंदरुपें जया नित्य वास । नमी तो विभू श्रीगुरु रामदास ।।
श्रीसमर्थाष्टके

सौ. अंजली कुसूरकर आणि सहकारी

*********

# प्रकाशकीय मनोगत

सुखकर्ता दु:खहर्ता वार्ता विघ्नाची । नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची ।।

गणाधीश जो ईश सर्वागुणांचा । मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ।।

ॐ नमोजि गणनायका । सर्वसिध्दीफलदायका । अज्ञानभ्रांतिछेदका । बोधरुपा ।।०१.०२.००१।।

कोणत्याही कार्यारंभी गणेशवंदन करण्याची पद्धत आहे. अद्वैत प्रकाशनातर्फे आजच्या सुमंगल सुमुहुर्तावर दासबोध आणि त्याची ''हे शब्द रत्नाचे सागर'' ही शब्द ओवी सूची प्रकाशित करताना म्हणूनच, आरंभी समर्थांनी तीन विभिन्न प्रकारें केलेले, गणेश स्तवन उद्‌धृत केले आहे. प्रथम स्तवन हे सर्वांमुखी असलेली गणेश आरती आहे; दुसरे स्तवन मनाच्या श्लोकातील, तर तिसरे समर्थांची ''वाङ्मयीन मूर्ती'' असलेल्या दासबोधातील आहे.

**''शुकासारिखे पूर्ण वैराग्य ज्याचे । वसिष्ठापरी ज्ञान योगेश्वराचे । कवी वाल्मिकासारिखा मान्य ऐसा । नमस्कार माझा सद्‌गुरु रामदासा ।।''** रामहृदयनिवासी समर्थांचा जन्म रामनवमीचे तिथीलाच व त्याच मुहूर्तावर सन १६०८ साली जालना जिल्ह्यातील जांब गावी झाला. बालवयातच समर्थांना प्रभू श्रीरामांचे दर्शन व अनुग्रह प्राप्त झाला. 'चिंत करितो विश्वाची' असे म्हणत १२व्या वर्षीच विवाहवेदीवरून पलायन केले व नाशिकसमीप टाकळी येथे एक तप घोर तपश्चर्या केली. तद्‌नंतर पुढील तप (१२ वर्षे) हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत पायी तीर्थयात्रा करून त्या काळच्या समाजजीवनाचे सूक्ष्म अवलोकन केले. त्यानंतर महाराष्ट्र देशी ''मराठा तितुका मिळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा ।।'' या उद्देशाने आध्यात्मिक व सामाजिक कार्य राजकारणाधारे सुरु केले. मसूर येथे मारुतीची तर चाफळला राममूर्तीची स्थापना केली. सन १६४९ चे सुमारास शिवरायांची भेट झाली व पुढे शिवबांना अनुग्रह दिला. ''निश्चयाचा महामेरु। बहुत जनांसी आधारु । अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ।'' अशा शिवरायांनी समर्थांचे झोळीत स्वराज्याचे दान केले ; ते अर्थातच निस्पृह समर्थांनी परत केले. दासबोधासह विपुल वाङमयीन निर्मिती शिवथरघळी केली. शिवबांचे निर्वाणानंतर संभाजीराजांना पत्र लिहिले. एकांतप्रिय असूनही प्रचंड लोकसंग्रह केला कारण ज्या संतमहात्म्याला दिव्य जीवन लाभते त्याने सामान्य जनात मिसळून बहुजन समाजही दिव्य जीवन भोगण्यास पात्र करावा असा समर्थांचा आग्रह होता. स्वराज्य व सुराज्य आध्यात्मिक पायावर उत्तुंग करण्यासाठी समर्थांनी सुमारे अकराशे मठ स्थापन केले. या मठाधिपतीपदी बुध्दिमान, चतुर, निस्पृह व लोकसंग्रहक शिष्यांची नियुक्ती केली आणि 'याचि देही याचि डोळा' शिवराज्याभिषेक व स्वराज्यस्थापनेचे स्वप्न ''ही

तो श्रींची इच्छा'' या न्यायाने पूर्ण झाल्याचे अनुभवून ''आनंदवनभुवनी'' स्वात्मानंदात असतानाच इ.स. १६८२ साली सज्जनगडावर समर्थांनी श्रीरामचरणी लौकिकार्थाने देह ठेवला. हा झाला समर्थांचा सर्वसाधारण जीवनपट !

वरील वाक्यात आपण 'लौकिकार्थाने' देह ठेवला असे म्हटले कारण समर्थांनीच स्पष्ट केले आहे की –

माझी काया आणि वाणी । गेली म्हणाल अंत:करणी । परी मी आहे जनजीवनी । निरंतर ।।
आत्माराम दासबोध । माझे स्वरूप स्वत:सिध्द ।असता न करावा खेद । भक्तजनी ।।

अशा प्रकारे दासबोध ही समर्थांची वाङमयीन मूर्तीच आहे. शिवाय पदे, आरत्या, करुणाष्टकें, मनाचे श्लोक, जुना दासबोध, रामायणातील सुंदर आणि युद्धकांड, आत्माराम, जनस्वभावगोसावी, षट्रिपुनिरुपण, ओवीबद्ध पत्रे व अन्य विपुल वाङमय निर्मिती समर्थांनी केली आहे. यातील मनोगताच्या प्रारंभी दिलेली 'सुखकर्ता' ही गणपतीची व ''व्याघ्रांबर फणीवरधर'' ही शंकराची आरती मराठी भाषिकांत प्रचंड लोकप्रिय आहे. तद्वतच ''अचपळ मन माझे नावरे आवरितां । परमदिनदयाळा धाव रे धाव आता ।'' यासारखी करुणामय, प्रेमळ आणि कोमल 'करुणाष्टके' सुद्धा सुपरिचित आहेत आणि

''मना सज्जना भक्तिपंथेचि जावे ।''
''प्रभाते मनी राम चिंतीत जावा ।''
''स्वये सर्वदा नम्र वाचे वदावे । मना सर्व लोकांसी रे निववावे ।''
''जनी सर्वसुखी असा कोण आहे ।''
''समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळी कोण आहे ।''
''सदा सर्वदा देव सन्निध आहे । कृपाळुपणे अल्प धारिष्ट पाहे ।''

ही आणि यासारखी सुभाषितस्वरुपच होऊन राहिलेले ''मनाचे श्लोक'' तर जनमानसात खोलवर रुजलेले आहेत. त्याचप्रमाणे, ''देव भक्त एक जाले । मिळाले जीव सर्वही । संतोष पावले तेणें । आनंदवनभुवनी ।'' आणि ''बंड पाषांड उडाले । शुद्ध अध्यात्म वाढले । रामकर्ता रामभोक्ता । आनंदवनभुवनी ।।'' हे साधारण साठ श्लोकी स्तोत्र जणू आनंदतरंगावर आरूढ होऊन राजराज्याचे स्वप्न दर्शविणारे समर्थांचे 'पसायदान'च आहे आणि ''भीमरूपी महारूद्रा । वज्र हनुमान मारुती ।'' हे बलोपासनेचे महत्व विशद करणारे मारुतीस्तोत्र तर खरोखरी सर्वमुखी आहे.

तथापि, ज्ञानेश्वर माउली म्हणजे जशी 'ज्ञानेश्वरी', नाथ महाराज म्हणजे जसे ''एकनाथी भागवत'' आणि जगद्गुरु तुकाराम महाराज म्हणजे जशी ''अभंग गाथा'' याप्रमाणे रामदास स्वामी म्हणजे ''दासबोध'' होय; कारण ग्रंथसमाप्तीचे समासी समर्थांनीच स्पष्ट केले आहे की –

भक्तांचेनि साभिमाने । कृपा केली दाशरथीने । समर्थ कृपेची वचनें । तो हा दासबोध ।।२०.१०.०३०।।

ग्रंथारंभीच समर्थांची स्पष्ट केल्याप्रमाणे ''येथ बोलिला विशद । भक्तिमार्ग ।'' (०१.०१.००२) आणि ''बहुधा अध्यात्मनिरोपण । निरोपिले ।'' (०१.०१.००३) हे जरी खरे असले तरी, शुध्द अध्यात्माखेरीज, त्याग कशाचा करावयाचा, हे कळण्यासाठी, मूर्ख, करंट, अविद्या, कुविद्या, पढतमूर्ख, यांची लक्षणें विस्तारपूर्वक विशद केलेली आहेत. ग्रंथाचा अभ्यास करताना समर्थांचे मराठी, हिंदी, संस्कृत आणि उर्दु भाषेवरील प्रभुत्व प्रकर्षाने जाणवते. साधकाचे बोलणे, चालणे, वागणे, लिहीणे, वाचन, काम करणे हे सर्वकाही सुंदर असावे असे समर्थांचे सांगणे असे. जसे ''प्रसंग जाणोनि बोलावे । जाणपण काहीच न घ्यावे । लीनता धरुन जावे । जेथतेथे ।। (१५.०६.००३) आणि ''वचने बोलावी करुणेची । नाना प्रकारे स्तुतीची । अंतरे निवती सकळांची । ऐसे वदावे ।।'' (०४.०७.०२६) तसेच ''प्रात:काळीं उठावे । काही पाठांतर करावे । यशानुशक्ती आठवावे । सर्वोत्तमासी ।।'' (११.०३.०१५) समर्थांनी अंधश्रद्धा, अविवेक आणि आळसाला करंटेपण मानले; उलटपक्षी विवेकपूर्ण सदाचरण, अखंड सावधपणा व उदंड कष्टाला भाग्यवंतांचे लक्षण मानले. याकारणे ग्रंथात अध्यात्म निरूपणासोबत प्रपंचातील व्यवहाराची सुद्धा भरपूर शिकवण दिली आहे. यासंबंधी २-४ उदाहरणे देता येतील जसे –

''अपकीर्ती ते सांडावी । सत्कीर्ती वाढवावी । विवेकें दृढ धरावी । वाट सत्याची ।। (०२.०२.०४१)
''प्रेत्नेविण राहो नये । आळस दृष्टी आणू नये ।देह असता पाहो नये । वियोग उपासनेचा ।। (१४.०१.०६०)
''प्रपंचीं जो सावधान । तो परमार्थ करील जाण । प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ।। (१२.०१.००९)
''याकारणे ज्ञान दुल्लभ । पुण्य घडे अलभ्य लाभ । विचारवंता सुल्लभ । सकळ कांहीं ।। (१५.०२.०१२)

असो. सर्वसाधारण प्रापंचिक लोक ''आधी प्रपंच करावा नेटका।'' या वचनाची पूर्णपणे गल्लत करीत असतात. मात्र यासंबंधी समर्थांच्या तीन ओव्या सर्वकाही स्पष्ट करतात.

''आधी प्रपंच करावा नेटका । मग घ्यावे परमार्थ विवेका । येणे आळस करू नका । विवेकी हो ।।'' (१२.०१.००१), ''परमार्थ सांडुनि प्रपंच करिसी । तरी तू येमयातना भोगिसी । अंती परम कष्टी होसी । येमयातना भोगिता ।।'' (१२.०१.००४) आणि मतितार्थ सांगतात की, ''प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल । प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी ।।'' (१२.०१.००२)

अध्यात्ममार्गात मोक्षप्राप्ती किंवा ज्ञानप्राप्तीसाठी गुरुकृपेला पर्याय नाही ही महत्त्वाची बाबही दासबोधी सांगितली आहे. यासंबंधी एकदोन ओव्या सांगता येतील. जसे ''जंव नाही ज्ञानप्राप्ती । तंव चुकेना यातायाती । गुरूकृपेविण अधोगती । गर्भवास चुकेना ।।'' (०५.०१.०३५) आणि ''असो जयासि मोक्ष व्हावा । तेणें सद्गुरु करावा । सद्गुरुविण मोक्ष पावावा । हे कल्पांत न घडे ।।'' (०५.०१.०४४) तसेच ''सद्गुरुचेनि अभयंकरे । प्रगट होईजे ईश्वरें । संसारदु:खे अपारें । नासोनी जाती ।।'' (०५.०१.०४०)

दासबोध या शब्दाची उपपत्ती जो दास होतो त्यालाच बोध होतो अशीही करता येईल. हा प्रबंध नसून प्रकाशकीय मनोगत आहे याचे भान राखणे क्रमप्राप्त आहे. समर्थांनी ग्रंथाची फलश्रुती सांगितलेली ओवी नमूद करुन हा परिच्छेद पूर्ण करतो.

''नासे अज्ञान दु:ख भ्रांती । शीघ्रचि येथें ज्ञानप्राप्ती । ऐसी आहे फलश्रुती । ईये ग्रंथी ।।'' (०१.०१.०३०) आणि
''वीस दशक दासबोध । श्रवणद्वारें घेता शोध । मननकर्त्यास विशद । परमार्थ होतो ।।'' (२०.१०.०३१)

**''सामर्थ्य आहे चळवळीचे । जो जो करील तयाचे । परंतु येथे भगवंताचे । अधिष्ठान पाहिजे ।।''** (२०.०४.०२६). अद्वैत प्रकाशनातर्फे चतुरंगी ज्ञानेश्वरी आणि ज्ञानेश्वरी व तुकाराम गाथेची शब्द ओवी–अभंगसूची प्रकाशित केली गेली. या प्रत्येक प्रकल्पात ''भगवंताचे अधिष्ठान'' म्हणजे काय याची प्रचिती आली. याच मालिकेत दासबोधाची ही शब्द ओवी सूची पूर्णत्वास जातानाही सुदैवाने ''भगवंताचे अधिष्ठान'' प्रत्ययास आले. दासबोध सूचीचे कार्य पूर्णत्वास येत असतानाच ही सीडी सज्जनगडावर जाऊन समर्थचरणी समर्पित करावी असा विचार झाला. तथापि, सज्जनगडावरील परिस्थिती व तेथील अधिकारी वर्गापैकी कोणाचाही परिचय नसल्याने काय करावे ? याचा विचार चालू असतानाच अचानक एक दूरध्वनी आला आणि समोरील व्यक्तीने रंगीत ज्ञानेश्वरीची मागणी केली; व मी सज्जनगडावरुन मामा कुलकर्णी बोलतो आहे असे सांगितले. लगेचच ते स्वत: पुण्यात आले व तिथे स्वत: मामा कुलकर्णी, अप्पा कुलकर्णी आणि विशेष म्हणजे स्वामी समर्थांचे चौदावे वंशज प.पू. भूषण स्वामी या सर्वांची भेट झाली. या त्रयीने संपूर्ण प्रकल्प आस्थेने अवलोकन केला आणि गडावर आल्यावर सर्वतोपरी सहकार्य करण्याचे मनोमन आश्वासन दिले. या विभूतींची भेट म्हणजे समर्थकृपा आणि ''भगवंताचे अधिष्ठान'' असेच मानावे लागेल.

या समर्थांच्या कार्याला मान्यवर अधिकारी व्यक्तीच्या मान्यतेची मोहोर लागणे आवश्यक होते. ही मनोकामना श्री. सुनीलजी चिंचोलकर यांनी पूर्णत्वास नेली. श्री. सुनीलजी चिंचोलकर हे विवेकानंद व रामकृष्ण यांचे कार्य आणि साहित्य वाङमयाचे प्रेमी, अभ्यासक व प्रचारक आहेत. तद्वतच श्री. चिंचोलकर हे समग्र समर्थ वाङमयाचे

सुद्धा अधिकारी अभ्यासक, प्रवचनकार, मार्गदर्शक व प्रेमी आहेत. त्यांनी संपूर्ण प्रकल्पाची आस्थेने माहिती घेतली आणि प्रस्तावना रुपात आशीर्वाद स्वहस्ताक्षरात दिले आहेत. अद्वैत प्रकाशन त्यांचे सदैव ऋणी राहील. या कार्यात श्री. सुनीलजींचे मार्गदर्शन, अनमोल सूचना व सहकार्य आणि आशीर्वाद मिळाले ही समर्थांची या कार्यास मिळालेली पोचपावतीच जणू ! विशेष नमुद करण्याची बाब म्हणजे स्वामी गोविंददेव गिरी उर्फ आचार्य किशोरजी व्यास यांनीही हा प्रकल्प पाहिला आणि समाधान व्यक्त केले. त्यांनाही आम्ही वंदन करतो.

श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची भेट घडवून आणली ती आमचे स्नेही श्री. प्रा. संजय रानडे सर यांनी. श्री. रानडे सरांनीही प्रकल्पाची माहिती घेऊन काही सूचना केल्या. आम्ही रानडे सरांचेही आभारी आहोत. वरील ‘‘भगवंताचे अधिष्ठान’’ या परिच्छेदात उल्लेख केल्यानुसार सज्जनगडनिवासी प.पू. भूषणस्वामी, श्री. मामा आणि श्री. अप्पा कुलकर्णी या त्रिमूर्तींनी जे मार्गदर्शन केले त्याबद्दल त्यांनाही अभिवादन करून त्यांचे आभार मानतो. अद्वैत प्रकाशनाचे नित्याचे आधारस्तंभ असलेले श्री. अविनाश कढे (डीटीपी), श्री. दीक्षित (आर्टिस्ट) आणि श्री. सुरेंद्र रानडे (सीडी) यांचेही आभार मानणे आवश्यक आहे.

**‘‘नका करु खटपट । पहा माझा ग्रंथ नीट । तेणे सायुज्याची वाट । गवसेल की ।।’’** असा हा दासबोधाचा ग्रंथ ‘‘नीट’’ पाहता पाहता ही सुमारे नव्वद हजार शब्दांची ‘‘हे शब्द रत्नाचे सागर’’ नावाची शब्द ओवी सूची समर्थकृपेने पूर्णत्वास गेली आहे. समर्थ साहित्य तसेच दासबोधाचे वाचक, अभ्यासक, साधक, प्रवचन आणि कीर्तनकार व अन्य भक्तजनांस या शब्द ओवी सूचीचा निश्चीतच लाभ होईल आणि सर्वांना ‘‘सायुज्याची वाट’’ गवसेल असा विश्वास वाटतो. ‘‘महारूद्र जे मारुती राम दास । कलीमाजी ते जाहले रामदास ।।’’ अशा समर्थ रामदास स्वामींना त्यांच्याच शब्दात प्रार्थना करुन हे मनोगत पूर्ण करतो.

‘‘मला वाटतें अंतरीं त्वां वसावे ।
तुझ्या दासबोधासि त्वां बोधवावे ।
अपत्यापरी पाववी प्रेमग्रासा ।
महाराजया सद्गुरु रामदासा ।।’’

*********

अद्वैत पब्लिकेशन्स्

# प्रकल्प

‘ऐसीं नानावर्णे रूपडीं’ –श्री ज्ञानेश्वरी – दृष्टांत सिद्धांत रूप चतुरंगातील पारायण प्रत
‘तो वाग्यज्ञु म्हणिजे’ – श्री ज्ञानेश्वरी – शब्द ओवी सूची
‘ते हे मंत्ररहस्य गीता’ –श्रीमद् भगवद्गीता – शब्द श्लोक सूची
‘हे गीतासागर तरंग’ – श्रीमद् भगवद्गीता पठण – दृक श्राव्य प्रकल्प
‘तुका झालासे कळस’ – श्री तुकाराम गाथा – शब्द अभंग सूची
‘हे शब्द रत्नांचे सागर’ – श्रीमद् दासबोध – शब्द ओवी सूची
‘शब्दब्रह्में होसी आकळा’ – श्री ज्ञानदेव गाथा – शब्द अभंग सूची
‘नाचू कीर्तनाचे रंगी’ – श्री नामदेव गाथा – शब्द अभंग सूची
‘श्रीकृष्णकीर्तीचे एकेक अक्षर’ – श्री एकनाथी भागवत – शब्द ओवी सूची
‘तयाचे बिसाट शब्द’ – श्री ज्ञानदेव हरिपाठ – शब्द अभंग सूची

## श्री समर्थांनी केलेली श्रीरामाची प्रार्थना

कल्याण करी रामराया । जनहित विवरी ।।धृ।।
तळमळ तळमळ होतचि राहे । हे जन हातिं धरी ।।१।।
अपराधी जन चुकतचि गेले । तुझा तूंची सावरी ।।२।।
कठिण त्यावरी कठीण जालें । आतां न दिसे उरी ।।३।।
कोठें जावे काय करावें । आरंभिली बोहरी ।।४।।
दास म्हणे आम्ही केलें पावलों । दयेसि नाहीं सरी ।।५।।

********************************

ध्यान करूं जाता मन हारपलें । सगुणीं जाहलें गुणातीत ।।१।।
जेथें पाहे तेथें राघवाचे ठाण । करीं चापबाण शोभतसे ।।२।।
राम माझे मनीं राम माझे ध्यानीं । शोभे सिंहासनीं राम माझ्या ।।३।।
रामदास म्हणे विश्रांति मागणें । जीवीचें सांगणें हितगुज ।।४।।

# ।। समर्थ दासबोध दशक।।

## ।। दशक पहिला : स्तवनाचा ।।१।।

## ।। दशक दुसरा : मूर्खलक्षणांचा ।।२।।

## ।। दशक तिसरा : स्वगुणपरीक्षा ।।३।।

## ।। दशक चवथा : नवविधा भक्ति ।।४।।

समास पहिला : श्रवणभक्ति
समास दुसरा : कीर्तनभक्ति
समास तिसरा : नामस्मरणभक्ति
समास चवथा : पादसेवनभक्ति
समास पाचवा : अर्चनभक्ति
समास सहावा : वंदनभक्ति
समास सातवा : दास्यभक्ति
समास आठवा : सख्यभक्ति
समास नववा : आत्मनिवेदनभक्ति
समास दहावा : मुक्तिचतुष्टय

## ।। दशक पाचवा : मंत्रांचा ।।५।।

## ।। दशक सहावा : देवशोधन ।।६।।

## ।। दशक सातवा : चौदा ब्रह्मांचा ।।७।।

## ।। दशक आठवा : मायोद्भवनाम ज्ञानदशक ।।८।।

## ।। दशक नववा : गुणरूप ।।९।।

## ।। दशक दहावा : जगज्योतिनाम ।।१०।।

## ।। दशक अकरावा : भीमदशक ।।११।।

समास पहिला : सिद्धांतनिरूपण
समास दुसरा : चत्वारदेवनिरूपण
समास तिसरा : सिकवण निरूपण
समास चवथा : सारविवेकनिरूपण
समास पांचवा : राजकारण निरूपण
समास सहावा : महंत लक्षण
समास सातवा : चंचळ नदी निरूपण
समास आठवा : अंतरात्माविवरण
समास नववा : उपदेश निरूपण
समास दहावा : निःस्पृह वर्तणूक

# ।। दशक बारावा : विवेकवैराग्य ।।१२।।

## ।। दशक तेरावा : नामरूप ।।१३।।

## ।। दशक चौदावा : अखंड ध्याननाम ।।१४।।

## ।। दशक पंधरावा : आत्मदशक ।।१५।।

समास पहिला : चातुर्य लक्षण
समास दुसरा : निःस्पृह व्याप
समास तिसरा : श्रेष्ठ अंतरात्मा निरूपण
समास चवथा : शाश्वतब्रह्मनिरूपण
समास पांचवा : चंचळ लक्षण
समास सहावा : चातुर्य विवरण
समास सातवा : अधोर्धनिरूपण
समास आठवा : सूक्ष्मजीवनिरूपण
समास नववा : पिंडोत्पत्तिनिरूपण
समास दहावा : सिद्धांतनिरूपण

## ।। दशक सोळावा : सप्ततिन्वयाचा ।।१६।।

## ।। दशक सतरावा : प्रकृति पुरुष ।।१७।।

## ।। दशक अठरावा : बहुजिनसी ।।१८।।

## ।। दशक एकोणिसावा : शिकवण ।।१९।।

## ।। दशक विसावा : पूर्णदशक ।।२०।।

समास पहिला : पूर्णापूर्णनिरूपण
समास दुसरा : सृष्टीत्रिविधलक्षणनिरूपण
समास तिसरा : सूक्ष्मनामाभिधान
समास चवथा : आत्मानिरूपण
समास पांचवा : चत्वारजिनस
समास सहावा : आत्मागुणनिरूपण
समास सातवा : आत्मानिरूपण
समास आठवा : देहेक्षेत्रनिरूपण
समास नववा : सूक्ष्मनिरूपण
समास दहावा : विमलब्रह्मनिरूपण

## ।। अनुक्रमणिका (अक्षरवार शब्दसंख्या) ।।

| भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अ | १ | ११८४७ | १२ | ड | २९००५ | ९० | २४ | य | ६५७५६ | २८१५ |
| २ | क | ११८४८ | ६८९३ | १३ | ढ | २९०९५ | ३९ | २५ | र | ६८५७१ | ११३२ |
| ३ | ख | १८७४१ | ४९५ | १४ | त | २९१३४ | ६७२७ | २६ | ल | ६९७०३ | १५०४ |
| ४ | ग | १९२३६ | १५४८ | १५ | थ | ३५८६१ | २३२ | २७ | व | ७१२०७ | ५४१७ |
| ५ | घ | २०७८४ | ९२८ | १६ | द | ३६०९३ | ३३०४ | २८ | श | ७६६२४ | ११४० |
| ६ | च | २१७१२ | १३८७ | १७ | ध | ३९३९७ | ८६९ | २९ | श्र | ७७७६४ | ५१६ |
| ७ | छ | २३०९९ | ४८ | १८ | न | ४०२६६ | ७२६७ | ३० | ष | ७८२८० | २ |
| ८ | ज | २३१४७ | ५२७८ | १९ | प | ४७५३३ | ७१९२ | ३१ | स | ७८२८२ | ७८३६ |
| ९ | झ | २८४२५ | १५० | २० | फ | ५४७२५ | ३५१ | ३२ | ह | ८६११८ | २४३८ |
| १० | ट | २८५७५ | ९२ | २१ | ब | ५५०७६ | २९०४ | ३३ | क्ष | ८८५५६ | १८६ |
| ११ | ठ | २८६६७ | ३३८ | २२ | भ | ५७९८० | २१०० | ३४ | ज्ञ | ८८७४२ | ४१९ |
| | | | | २३ | म | ६००८० | ५६७६ | | एकूण | ८९१६० | |

# अ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १ | ॐ | १ | ४ | |
| २ | अ | ५ | ४३९९ | |
| ३ | आ | ४४०४ | ४२२६ | |
| ४ | इ | ८६३० | १६० | |
| ५ | ई | ८७९० | ८८ | |
| ६ | उ | ८८७८ | १६२३ | |
| ७ | ऊ | १०५०१ | ११ | |
| ८ | ऋ | १०५१२ | २६ | |
| ९ | ए | १०५३८ | २८ | |
| १० | ऐ | १०५६६ | १२५३ | |
| ११ | ओ | ११८१९ | ३ | |
| १२ | औ | ११८२२ | २६ | |
| | अ | | | ११८४७ |

# क

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १३ | क | ११८४८ | २७१५ | | २१ | कै | १७३८५ | ५५८ | |
| १४ | का | १४५६३ | १५०८ | | २२ | को | १७९४३ | ६८४ | |
| १५ | कि | १६०७१ | २३५ | | २३ | कौ | १८६२७ | ३५ | |
| १६ | की | १६३०६ | १८५ | | २४ | क्र | १८६६२ | ५ | |
| १७ | कु | १६४९१ | १९५ | | २५ | क्रि | १८६६७ | ३५ | |
| १८ | कू | १६६८६ | १८ | | २६ | क्री | १८७०२ | १ | |
| १९ | कृ | १६७०४ | ८८ | | २७ | क्रो | १८७०३ | ३७ | |
| २० | के | १६७९२ | ५९३ | | २८ | क्लृ | १८७४० | १ | |
| | | | | | | क | | | ६८९३ |

# ख

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २९ | ख | १८७४१ | १७८ | |
| ३० | खा | १८९१९ | ११० | |
| ३१ | खि | १९०२९ | ९ | |
| ३२ | खु | १९०३८ | ३३ | |
| ३३ | खू | १९०७१ | ३० | |
| ३४ | खे | १९१०१ | ४९ | |
| ३५ | खो | १९१५० | ८४ | |
| ३६ | ख्या | १९२३४ | २ | |
| | ख | | | ४९५ |

# ग

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ३७ | ग | ११२३६ | ३३९ | |
| ३८ | गा | ११५७५ | ९२ | |
| ३९ | गि | ११६६७ | १३ | |
| ४० | गी | ११६८० | ६ | |
| ४१ | गु | ११६८६ | ४८५ | |
| ४२ | गू | २०१७१ | ७ | |
| ४३ | गृ | २०१७८ | १६ | |
| ४४ | गे | २०१९४ | ३१८ | |
| ४५ | गै | २०५१२ | १ | |
| ४६ | गो | २०५१३ | १७७ | |
| ४७ | गौ | २०६९० | १२ | |
| ४८ | ग्र | २०७०२ | ६२ | |
| ४९ | ग्रा | २०७६४ | १८ | |
| ५० | ग्री | २०७८२ | १ | |
| ५१ | ग्लां | २०७८३ | १ | |
| | ग | | | १५४८ |

# घ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ५२ | घ | २०७८४ | ४११ | |
| ५३ | घा | २११९५ | १६६ | |
| ५४ | घि | २१३६१ | ३ | |
| ५५ | घी | २१३६४ | १ | |
| ५६ | घु | २१३६५ | ६ | |
| ५७ | घृ | २१३७१ | २ | |
| ५८ | घे | २१३७३ | २०० | |
| ५९ | घो | २१५७३ | १८ | |
| ६० | घ्या | २१५९१ | ११० | |
| ६१ | घ्रा | २१७०१ | ११ | |
| | घ | | | ९२८ |

# च

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ६२ | च | २१७१२ | ५३८ | |
| ६३ | चा | २२२५० | २९१ | |
| ६४ | चि | २२५४१ | १९४ | |
| ६५ | ची | २२७३५ | ५ | |
| ६६ | चु | २२७४० | ११२ | |
| ६७ | चे | २२८५२ | ४२ | |
| ६८ | चै | २२८९४ | २६ | |
| ६९ | चो | २२९२० | ३८ | |
| ७० | चौ | २२९५८ | ८८ | |
| ७१ | च्वा | २३०४६ | १ | |
| ७२ | च्य | २३०४७ | १ | |
| ७३ | च्या | २३०४८ | ५१ | |
| | च | | | १३८७ |

# छ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ७४ | छ | २३०९९ | २१ | |
| ७५ | छा | २३१२० | १३ | |
| ७६ | छे | २३१३३ | १४ | |
| | छ | | | ४८ |

# ज

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ७७ | ज | २३१४७ | ११९१ | |
| ७८ | जा | २४३३८ | २३१६ | |
| ७९ | जि | २६६५४ | १५३ | |
| ८० | जी | २६८०७ | २८० | |
| ८१ | जु | २७०८७ | ९ | |
| ८२ | जे | २७०९६ | ७७९ | |
| ८३ | जै | २७८७५ | १६६ | |
| ८४ | जो | २८०४१ | २८१ | |
| ८५ | ज्या | २८३२२ | ९० | |
| ८६ | ज्यो | २८४१२ | १ | |
| ८७ | ज्व | २८४१३ | ३ | |
| ८८ | ज्वा | २८४१६ | ९ | |
| | ज | | | ५२७८ |

# झ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ८९ | झ | २८४२५ | ५१ | |
| ९० | झा | २८४७६ | ५२ | |
| ९१ | झि | २८५२८ | २० | |
| ९२ | झु | २८५४८ | १० | |
| ९३ | झे | २८५५८ | १ | |
| ९४ | झो | २८५५९ | १६ | |
| | झ | | | १५० |

# ट

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ९५ | ट | २८५७५ | १९ | |
| ९६ | टा | २८५९४ | ५२ | |
| ९७ | टि | २८६४६ | ४ | |
| ९८ | टु | २८६५० | ३ | |
| ९९ | टे | २८६५३ | ३ | |
| १०० | टो | २८६५६ | १० | |
| १०१ | टौ | २८६६६ | १ | |
| | ट | | | ९२ |

# ठ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १०२ | ठ | २८६६७ | २४ | |
| १०३ | ठा | २८६९१ | २५० | |
| १०४ | ठु | २८९४१ | १ | |
| १०५ | ठे | २८९४२ | ५८ | |
| १०६ | ठो | २९००० | ५ | |
| | ठ | | | ३३८ |

# ड

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १०७ | ड | २९००५ | २६ | |
| १०८ | डा | २९०३१ | ४ | |
| १०९ | डि | २९०३५ | १ | |
| ११० | डी | २९०३६ | १ | |
| १११ | डु | २९०३७ | ६ | |
| ११२ | डो | २९०४३ | ५२ | |
| | ड | | | ९० |

# ढ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ११३ | ढ | २९०९५ | १६ | |
| ११४ | ढा | २९१११ | ६ | |
| ११५ | ढि | २९११७ | ६ | |
| ११६ | ढी | २९१२३ | २ | |
| ११७ | ढे | २९१२५ | ५ | |
| ११८ | ढो | २९१३० | ४ | |
| | ढ | | | ३९ |

# त

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ११९ | त | २९१३४ | १५३७ | | १२८ | तो | ३३९७० | ११५१ | |
| १२० | ता | ३०६७१ | १६८ | | १२९ | त्य | ३५१२१ | ४ | |
| १२१ | ति | ३०८३९ | २१७ | | १३० | त्या | ३५१२५ | ५९४ | |
| १२२ | ती | ३१०५६ | ९५ | | १३१ | त्र | ३५७१९ | ७ | |
| १२३ | तु | ३११५१ | २१७ | | १३२ | त्रा | ३५७२६ | १७ | |
| १२४ | तू | ३१३६८ | ३३ | | १३३ | त्रि | ३५७४३ | ८५ | |
| १२५ | तृ | ३१४०१ | २४ | | १३४ | त्रै | ३५८२८ | २० | |
| १२६ | ते | ३१४२५ | २२१३ | | १३५ | त्व | ३५८४८ | १३ | |
| १२७ | तै | ३३६३८ | ३३२ | | | त | | | ६७२७ |

# थ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १३६ | थ | ३५८६१ | ८ | |
| १३७ | था | ३५८६९ | २२ | |
| १३८ | थि | ३५८९१ | १० | |
| १३९ | थु | ३५९०१ | ७ | |
| १४० | थे | ३५९०८ | २ | |
| १४१ | थै | ३५९१० | ३ | |
| १४२ | थो | ३५९१३ | १८० | |
| | थ | | | २३२ |

# द

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १४३ | द | ३६०९३ | १८५ | | १५३ | द्या | ३९१८३ | ३६ | |
| १४४ | दा | ३६२७८ | २०१ | | १५४ | द्र | ३९२१९ | ८४ | |
| १४५ | दि | ३६४७९ | ३४८ | | १५५ | द्रो | ३९३०३ | १ | |
| १४६ | दी | ३६८२७ | ५८ | | १५६ | द्व(द्व्य सह) | ३९३०४ | ४ | |
| १४७ | दु | ३६८८५ | ४८८ | | १५७ | द्वा | ३९३०८ | १७ | |
| १४८ | दू | ३७३७३ | ७ | | १५८ | द्वि | ३९३२५ | १४ | |
| १४९ | दृ | ३७३८० | २५७ | | १५९ | द्वी | ३९३३९ | २ | |
| १५० | दे | ३७६३७ | १३५३ | | १६० | द्वे | ३९३४१ | १० | |
| १५१ | दै | ३८९९० | ३२ | | १६१ | द्वै | ३९३५१ | ४६ | |
| १५२ | दो | ३९०२२ | १६१ | | | द | | | ३३०४ |

# ध

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १६२ | ध | ३९३९७ | ४८३ | |
| १६३ | धा | ३९८८० | १६६ | |
| १६४ | धि | ४००४६ | ११ | |
| १६५ | धी | ४००५७ | ३३ | |
| १६६ | धु | ४००९० | २७ | |
| १६७ | धू | ४०११७ | ३७ | |
| १६८ | धृ | ४०१५४ | ४ | |
| १६९ | धो | ४०१५८ | १४ | |
| १७० | ध्या | ४०१७२ | ८३ | |
| १७१ | ध्ये | ४०२५५ | ४ | |
| १७२ | ध्व | ४०२५९ | ७ | |
| | ध | | | ८६९ |

# न

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १७३ | न | ४०२६६ | १९०५ | |
| १७४ | ना | ४२१७१ | २७७६ | |
| १७५ | नि | ४४९४७ | १९२२ | |
| १७६ | नी | ४६८६९ | ११४ | |
| १७७ | नु | ४६९८३ | २६ | |
| १७८ | नू | ४७००९ | ११ | |
| १७९ | नृ | ४७०२० | २० | |
| १८० | ने | ४७०४० | ४०५ | |
| १८१ | नै | ४७४४५ | १४ | |
| १८२ | नो | ४७४५९ | ५ | |
| १८३ | न्या | ४७४६४ | ५७ | |
| १८४ | न्यू | ४७५२१ | ११ | |
| १८५ | न्हा | ४७५३२ | १ | |
| | न | | | ७२६७ |

# प

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८६ | प | ४७५३३ | २३०२ | | १९४ | पै | ५२८६८ | ५१ | |
| १८७ | पा | ४९८३५ | १७८६ | | १९५ | पो | ५२९१९ | १२७ | |
| १८८ | पि | ५१६२१ | १७० | | १९६ | प्र | ५३०४६ | ११५६ | |
| १८९ | पी | ५१७९१ | ३२ | | १९७ | प्रा | ५४२०२ | ४२१ | |
| १९० | पु | ५१८२३ | ७०८ | | १९८ | प्रि | ५४६२३ | २ | |
| १९१ | पू | ५२५३१ | १६४ | | १९९ | प्री | ५४६२५ | ३९ | |
| १९२ | पृ | ५२६९५ | १४९ | | २०० | प्रे | ५४६६४ | ५९ | |
| १९३ | पे | ५२८४४ | २४ | | २०१ | प्रौ | ५४७२३ | २ | |
| | | | | | | प | | | ७११२ |

# फ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २०२ | फ | ५४७२५ | १४४ | |
| २०३ | फा | ५४८६९ | ३९ | |
| २०४ | फि | ५४९०८ | ६० | |
| २०५ | फी | ५४९६८ | १ | |
| २०६ | फु | ५४९६९ | ६५ | |
| २०७ | फू | ५५०३४ | १ | |
| २०८ | फे | ५५०३५ | ११ | |
| २०९ | फो | ५५०४६ | २७ | |
| २१० | फौ | ५५०७३ | ३ | |
| | फ | | | ३५१ |

# ब

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २११ | ब | ५५०७६ | ८६१ | |
| २१२ | बा | ५५९३७ | ३०४ | |
| २१३ | बि | ५६२४१ | ११ | |
| २१४ | बी | ५६२५२ | ४४ | |
| २१५ | बु | ५६२९६ | १६० | |
| २१६ | बे | ५६४५६ | १६ | |
| २१७ | बै | ५६४७२ | १०० | |
| २१८ | बो | ५६५७२ | ७५३ | |
| २१९ | ब्या | ५७३२५ | १ | |
| २२० | ब्र | ५७३२६ | ५८७ | |
| २२१ | ब्रा | ५७९१३ | ६६ | |
| २२२ | ब्री | ५७९७९ | १ | |
| | ब | | | २९०४ |

# भ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २२३ | भ | ५७९८० | ८४३ | |
| २२४ | भा | ५८८२३ | ३७१ | |
| २२५ | भि | ५९१९४ | ८९ | |
| २२६ | भी | ५९२८३ | १७ | |
| २२७ | भु | ५९३०० | ४५ | |
| २२८ | भू | ५९३४५ | २७३ | |
| २२९ | भृ | ५९६१८ | २ | |
| २३० | भे | ५९६२० | १४४ | |
| २३१ | भै | ५९७६४ | ५ | |
| २३२ | भो | ५९७६९ | १६२ | |
| २३३ | भ्या | ५९९३१ | ५ | |
| २३४ | भ्र | ५९९३६ | ११९ | |
| २३५ | भ्रा | ६००५५ | २५ | |
| | भ | | | २१०० |

# म

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २३६ | म | ६००८० | १३१२ | | २४५ | मो | ६४२६८ | २१७ | |
| २३७ | मा | ६१३९२ | १२६७ | | २४६ | मौ | ६४४८५ | १० | |
| २३८ | मि | ६२६५९ | २८४ | | २४७ | म्या | ६४४९५ | ४ | |
| २३९ | मी | ६२९४३ | १५८ | | २४८ | म्ला | ६४४९९ | २ | |
| २४० | मु | ६३१०१ | ४५२ | | २४९ | म्ले | ६४५०१ | ३ | |
| २४१ | मू | ६३५५३ | ४०३ | | २५० | म्ह | ६४५०४ | १२४५ | |
| २४२ | मृ | ६३९५६ | २०० | | २५१ | म्हा | ६५७४९ | १ | |
| २४३ | मे | ६४१५६ | ९८ | | २५२ | म्है | ६५७५० | ६ | |
| २४४ | मै | ६४२५४ | १४ | | | म | | | ५६७६ |

# य

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २५३ | य | ६५७५६ | २३ | |
| २५४ | या | ६५७७९ | ७०५ | |
| २५५ | यी | ६६४८४ | १ | |
| २५६ | यु | ६६४८५ | ४४ | |
| २५७ | ये | ६६५२९ | १९१४ | |
| २५८ | यो | ६८४४३ | १२८ | |
| | य | | | २८१५ |

# र

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २५९ | र | ६८५७१ | ३२६ | |
| २६० | रा | ६८८९७ | ५१६ | |
| २६१ | रि | ६९४१३ | ३५ | |
| २६२ | री | ६९४४८ | १५ | |
| २६३ | रु | ६९४६३ | ५२ | |
| २६४ | रू | ६९५१५ | ८३ | |
| २६५ | रे | ६९५९८ | ३१ | |
| २६६ | रो | ६९६२९ | ७४ | |
| | र | | | ११३२ |

# ल

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २६७ | ल | ६९७०३ | ४७७ | |
| २६८ | ला | ७०१८० | ५८० | |
| २६९ | लि | ७०७६० | २६ | |
| २७० | ली | ७०७८६ | १५ | |
| २७१ | लु | ७०८०१ | ३ | |
| २७२ | ले | ७०८०४ | ३५ | |
| २७३ | लो | ७०८३९ | ३५१ | |
| २७४ | लौ | ७११९० | ६ | |
| २७५ | ल्या | ७११९६ | ११ | |
| | ल | | | १५०४ |

# व

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २७६ | व | ७१२०७ | ८७६ | |
| २७७ | वा | ७२०८३ | १०१७ | |
| २७८ | वि | ७३१०० | २११६ | |
| २७९ | वी | ७५२१६ | ४२ | |
| २८० | वृ | ७५२५८ | १२७ | |
| २८१ | वे | ७५३८५ | ५०२ | |
| २८२ | वै | ७५८८७ | १७२ | |
| २८३ | वो | ७६०५९ | ३३९ | |
| २८४ | वौ | ७६३९८ | १ | |
| २८५ | व्य | ७६३९९ | ३ | |
| २८६ | व्या | ७६४०२ | १२७ | |
| २८७ | व्यो | ७६५२९ | १ | |
| २८८ | व्र | ७६५३० | १८ | |
| २८९ | व्हा | ७६५४८ | ७६ | |
| | व | | | ५४१७ |

# श

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २९० | श | ७६६२४ | ४१४ | |
| २९१ | शा | ७७०३८ | २३४ | |
| २९२ | शि | ७७२७२ | १३४ | |
| २९३ | शी | ७७४०६ | ६ | |
| २९४ | शु | ७७४१२ | १३३ | |
| २९५ | शू | ७७५४५ | ११ | |
| २९६ | शृ | ७७५५६ | २ | |
| २९७ | शे | ७७५५८ | २७ | |
| २९८ | शै | ७७५८५ | ५ | |
| २९९ | शो | ७७५९० | १७२ | |
| ३०० | शौ | ७७७६२ | २ | |
| | श | | | ११४० |

# श्र

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ३०१ | श्र | ७७७६४ | १८९ | |
| ३०२ | श्रा | ७७९५३ | ६ | |
| ३०३ | श्री | ७७९५९ | २६ | |
| ३०४ | श्रु | ७७९८५ | ३८ | |
| ३०५ | श्रे | ७८०२३ | २६ | |
| ३०६ | श्रो | ७८०४९ | २०२ | |
| ३०७ | श्ला | ७८२५१ | ७ | |
| ३०८ | श्ले | ७८२५८ | २ | |
| ३०९ | श्लो | ७८२६० | ७ | |
| ३१० | श्व | ७८२६७ | २ | |
| ३११ | श्वा | ७८२६९ | ५ | |
| ३१२ | श्वे | ७८२७४ | ६ | |
| | श्र | | | ५१६ |

# ष

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ३१३ | ष | ७८२८० | २ | |
| | ष | | | २ |

# स

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३१४ | स | ७८२८२ | ३५६८ | | ३२६ | स्त | ८५११८ | ३४ | | ३३८ | स्प | ८५४२० | १५ | |
| ३१५ | सा | ८१८५० | १८२० | | ३२७ | स्तु | ८५१५२ | १५ | | ३३९ | स्फु | ८५४३५ | ५ | |
| ३१६ | सि | ८३६७० | २४९ | | ३२८ | स्तो | ८५१६७ | १ | | ३४० | स्फू | ८५४४० | १४ | |
| ३१७ | सी | ८३९१९ | ७८ | | ३२९ | स्त्रि | ८५१६८ | १८ | | ३४१ | स्म | ८५४५४ | ४२ | |
| ३१८ | सु | ८३९९७ | ४४३ | | ३३० | स्त्री | ८५१८६ | ५० | | ३४२ | स्मा | ८५४९६ | १ | |
| ३१९ | सू | ८४४४० | १८४ | | ३३१ | स्थ | ८५२३६ | ४० | | ३४३ | स्मृ | ८५४९७ | ४ | |
| ३२० | सृ | ८४६२४ | १४४ | | ३३२ | स्था | ८५२७६ | २२ | | ३४४ | स्ले | ८५५०१ | १ | |
| ३२१ | से | ८४७६८ | १३४ | | ३३३ | स्थि | ८५२९८ | ६६ | | ३४५ | स्व | ८५५०२ | ४७२ | |
| ३२२ | सै | ८४९०२ | ११ | | ३३४ | स्थु | ८५३६४ | २ | | ३४६ | स्वा | ८५९७४ | १३८ | |
| ३२३ | सो | ८४९१३ | १९२ | | ३३५ | स्थू | ८५३६६ | ३६ | | ३४७ | स्वे | ८६११२ | ६ | |
| ३२४ | सौ | ८५१०५ | १२ | | ३३६ | स्ना | ८५४०२ | १४ | | | स | | | ७८३६ |
| ३२५ | स्क | ८५११७ | १ | | ३३७ | स्ने | ८५४१६ | ४ | | | | | | |

# ह

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ३४८ | ह | ८६११८ | १८८ | |
| ३४९ | हा | ८६३०६ | ३६४ | |
| ३५० | हि | ८६६७० | १३१ | |
| ३५१ | ही | ८६८०१ | ३५ | |
| ३५२ | हु | ८६८३६ | १४ | |
| ३५३ | हृ | ८६८५० | २४ | |
| ३५४ | हे | ८६८७४ | ७७१ | |
| ३५५ | हो | ८७६४५ | ९११ | |
| | ह | | | २४३८ |

# क्ष

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ३५६ | क्ष | ८८५५६ | ८८ | |
| ३५७ | क्षा | ८८६४४ | ७ | |
| ३५८ | क्षि | ८८६५१ | ८ | |
| ३५९ | क्षी | ८८६५९ | १४ | |
| ३६० | क्षु | ८८६७३ | १७ | |
| ३६१ | क्षे | ८८६९० | १४ | |
| ३६२ | क्षो | ८८७०४ | ८ | |
| ३६३ | क्ष्ण | ८८७१२ | १ | |
| ३६४ | क्ष्णा | ८८७१३ | २ | |
| ३६५ | क्ष्म | ८८७१५ | ३ | |
| ३६६ | क्ष्मा | ८८७१८ | २४ | |
| | क्ष | | | १८६ |

# ज्ञ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ३६७ | ज्ञा | ८८७४२ | ४१३ | |
| ३६८ | ज्ञे | ८९१५५ | ६ | |
| | ज्ञ | | | ४१९ |

| | |
|---|---|
| ०१.०१.००१ | श्रोते पुसती कोण ग्रंथ। काय बोलिलें जी येथ ।श्रवण केलियानें प्राप्त। काय आहे |
| ०१.०१.००२ | ग्रंथा नाम दासबोध। गुरुशिष्यांचा संवाद ।येथ बोलिला विशद। भक्तिमार्ग |
| ०१.०१.००३ | नवविधा भक्ति आणि ज्ञान। बोलिलें वैराग्याचें लक्षण ।बहुधा अध्यात्मनिरोपण। निरोपिलें |
| ०१.०१.००४ | भक्तिचेन योगें देव। निश्चयें पावती मानव ।ऐसा आहे अभिप्राव। ईये ग्रंथीं |
| ०१.०१.००५ | मुख्य भक्तीचा निश्चयो। शुद्धज्ञानाचा निश्चयो ।आत्मस्थितीचा निश्चयो। बोलिला असे |
| ०१.०१.००६ | शुद्ध उपदेशाचा निश्चयो। सायोज्यमुक्तीचा निश्चयो ।मोक्षप्राप्तीचा निश्चयो। बोलिला असे |
| ०१.०१.००७ | शुद्ध स्वरूपाचा निश्चयो। विदेहस्थितीचा निश्चयो ।अलिप्तपणाचा निश्चयो। बोलिला असे |
| ०१.०१.००८ | मुख्य देवाचा निश्चयो। मुख्य भक्ताचा निश्चयो ।जीवशिवाचा निश्चयो। बोलिला असे |
| ०१.०१.००९ | मुख्य ब्रह्माचा निश्चयो। नाना मतांचा निश्चयो ।आपण कोण हा निश्चयो। बोलिला असे |
| ०१.०१.०१० | मुख्य उपासनालक्षण। नाना कवित्वलक्षण ।नाना चातुर्यलक्षण। बोलिलें असे |
| ०१.०१.०११ | मायोद्भवाचें लक्षण। पंचभूतांचें लक्षण ।कर्ता कोण हें लक्षण। बोलिलें असे |
| ०१.०१.०१२ | नाना किंत निवारिले ।नाना संशयो छेदिले ।नाना आशंका फेडिले। नाना प्रश्न |
| ०१.०१.०१३ | ऐसें बहुधा निरोपिलें। ग्रंथगर्भी जें बोलिलें ।तें अवघेंचि अनुवादलें। न वचे किं कदा |
| ०१.०१.०१४ | तथापि अवघा दासबोध। दशक फोडून केला विशद ।जे जे दशकींचा अनुवाद। ते ते दशकीं बोलिला |
| ०१.०१.०१५ | नाना ग्रंथांच्या समती। उपनिषदें वेदांत श्रुती ।आणि मुख्य आत्मप्रचीती। शास्त्रेंसहित |
| ०१.०१.०१६ | नाना समतीअन्वये। म्हणौनी मिथ्या म्हणतां न ये ।तथापि हें अनुभवासि ये। प्रत्यक्ष आतां |
| ०१.०१.०१७ | मत्सरें यासी मिथ्या म्हणती। तरी अवघेचि ग्रंथ उछेदती ।नाना ग्रंथांच्या समती। भगवद्वाक्यें |
| ०१.०१.०१८ | शिवगीता रामगीता। गुरुगीता गर्भगीता ।उत्तरगीता अवधूतगीता। वेद आणी वेदांत |
| ०१.०१.०१९ | भगवद्गीता ब्रह्मगीता। हंसगीता पांडवगीता ।गणेशगीता येमगीता। उपनिषदें भागवत |
| ०१.०१.०२० | इत्यादिक नाना ग्रंथ। समतीस बोलिले येथ ।भगवद्वाक्यें येथार्थ। निश्चयेंसीं |
| ०१.०१.०२१ | भगवद्वचनी अविश्वासे। ऐसा कोण पतित असे ।भगवद्वाक्याविरहित नसे। बोलणें येथीचें |
| ०१.०१.०२२ | पूर्ण ग्रंथ पाहिल्याविण। उगाच ठेवी जो दूषण ।तो दुरात्मा दुराभिमान। मत्सरें करी |
| ०१.०१.०२३ | अभिमानें उठे मत्सर। मत्सरें ये तिरस्कार ।पुढें क्रोधाचा विकार। प्रबळे बळें |
| ०१.०१.०२४ | ऐसा अंतरीं नासला। कामक्रोधें खवळला ।अहंभावें पालटला। प्रत्यक्ष दिसे |
| ०१.०१.०२५ | कामक्रोधें लिथाडिला। तो कैसा म्हणावा भला ।अमृत सेवितांच पावला। मृत्य राहो |

| | |
|---|---|
| ०४.०६.०१४ | नमस्कारें लीनता घडे। नमस्कारें विकल्प मोडे ।नमस्कारें सख्य घडे। नाना सत्पात्रासीं |
| ०४.०६.०१५ | नमस्कारें दोष जाती। नमस्कारें अन्याय क्षमती ।नमस्कारें मोडलीं जडतीं। समाधानें |
| ०४.०६.०१६ | सिसापरता नाहीं दंड। ऐसें बोलती उदंड ।याकारणें अखंड। देव भक्त वंदावें |
| ०४.०६.०१७ | नमस्कारें कृपा उचंबळे। नमस्कारें प्रसन्नता प्रबळे ।नमस्कारें गुरुदेव वोळे। साधकांवरी |
| ०४.०६.०१८ | निशेष करितां नमस्कार। नासती दोषांचे गिरिवर ।आणी मुख्य परमेश्वर। कृपा करी |
| ०४.०६.०१९ | नमस्कारें पतित पावन। नमस्कारें संतांसी शरण ।नमस्कारें जन्ममरण। दुरी दुऱ्हावे |
| ०४.०६.०२० | परम अन्याय करूनि आला। आणी साष्टांग नमस्कार घातला ।तरी तो अन्याये क्षमा केला। पाहिजे श्रेष्ठीं |
| ०४.०६.०२१ | या कारणें नमस्कारापरतें। आणीक नाहीं अनुसरतें ।नमस्कारें प्राणीयातें। सद्बुद्धि लागे |
| ०४.०६.०२२ | नमस्कारास वेचावें नलगे। नमस्कारास कष्टावें नलगे ।नमस्कारास कांहींच नलगें। उपकर्ण सामग्री |
| ०४.०६.०२३ | नमस्कारा ऐसें नाहीं सोपें। नमस्कार करावा अनन्यरूपें ।नाना साधनीं साक्षपें। कासया सिणावें |
| ०४.०६.०२४ | साधक भावें नमस्कार घाली। त्याची चिंता साधूस लागली ।सुगम पंथें नेऊन घाली। जेथील तेथें |
| ०४.०६.०२५ | या कारणें नमस्कार श्रेष्ठ। नमस्कारें वोळती वरिष्ठ ।येथें सांगितली पष्ट। साहावी भक्ती |
| ०४.०७.००१ | मागां जालें निरूपण। साहवे भक्तीचें लक्षण ।आतां ऐका सावधान। सातवी भक्ती |
| ०४.०७.००२ | सातवें भजन तें दास्य जाणावें। पडिलें कार्य तितुकें करावें ।सदा सन्निधचि असावें। देवद्वारीं |
| ०४.०७.००३ | देवाचें वैभव संभाळावें। न्यूनपूर्ण पडोंचि नेदावें ।चढतें वाढतें वाढवावें। भजन देवाचें |
| ०४.०७.००४ | भंगलीं देवालयें करावीं। मोडलीं सरोवरें बांधावीं ।सोफे धर्मशाळा चालवावीं। नूतन चि कार्यें |
| ०४.०७.००५ | नाना रचना जीर्ण जर्जर। त्यांचे करावे जीर्णोद्धार ।पडिलें कार्य तें सत्वर। चालवित जावें |
| ०४.०७.००६ | गज रथ तुरंग सिंहासनें। चौकिया सिबिका सुखासनें ।मंचक डोल्हारे विमानें। नूतन चि करावीं |
| ०४.०७.००७ | मेघडंब्रें छत्रें चामरें। सूर्यापानें निशाणें अपारें ।नित्य नूतन अत्यादरें। सांभाळित जावीं |
| ०४.०७.००८ | नाना प्रकारीचीं यानें। बैसावयाचीं उत्तम स्थानें ।बहुविध सुवर्णासनें। येत्नें करीत जावीं |
| ०४.०७.००९ | भुवनें कोठड्या पेट्या मांदुसा। रांझण कोहळीं घागरी बहुवसा ।संपूर्ण द्रव्यांश ऐसा। अति येत्नें करावा |
| ०४.०७.०१० | भुयेरीं तळघरें आणी विवरें। नाना स्थळें गुप्त द्वारें ।अनर्घ्ये वस्तूंचीं भांडारें। येत्नें करीत जावीं |
| ०४.०७.०११ | आळंकार भूषणें दिव्यांबरें। नाना रत्नें मनोहरें ।नाना धातु सुवर्णपात्रें। येत्नें करीत जावीं |
| ०४.०७.०१२ | पुष्पवाटिका नाना वनें। नाना तरुवरांचीं बनें ।पावती करावीं जीवनें। तया वृक्षांसी |
| ०४.०७.०१३ | नाना पशूंचिया शाळा। नाना पक्षी चित्रशाळा ।नाना वाद्यें नाट्यशाळा। गुणी गायेक बहुसाल |

| | |
|---|---|
| ०४.०७.०१४ | स्वयंपाकगृहें भोजनशाळा। सामग्रीगृहें धर्मशाळा ।निद्रिस्तांकारणें पडशाळा। विशाळ स्थळें |
| ०४.०७.०१५ | नाना परिमळद्रव्यांचीं स्थळें। नाना खाद्यफळांचीं स्थळें ।नाना रसांचीं नाना स्थळें। येत्नें करीत जावीं |
| ०४.०७.०१६ | नाना वस्तांचीं नाना स्थानें। भंगलीं करावीं नूतनें ।देवाचें वैभव वचनें। किती म्हणौनि बोलावें |
| ०४.०७.०१७ | सर्वां ठाईं अति सादर। आणी दास्यत्वास हि तत्पर ।कार्यभागाचा विसर। पडणार नाहीं |
| ०४.०७.०१८ | जयंत्या पर्वें मोहोत्साव। असंभाव्य चालवी वैभव ।जें देखतां स्वर्गींचे देव। तटस्त होती |
| ०४.०७.०१९ | ऐसें वैभव चालवावें। आणी नीच दास्यत्वहि करावें ।पडिले प्रसंगीं सावध असावें। सर्वकाळ |
| ०४.०७.०२० | जें जें कांहीं पाहिजे। तें तें तत्काळचि देजे ।अत्यंत आवडीं कीजे। सकळ सेवा |
| ०४.०७.०२१ | चरणक्षाळणें स्नानें आच्मनें। गंधाक्षतें वसनें भूषणें ।आसनें जीवनें नाना सुमनें। धूप दीप नैवेद्य |
| ०४.०७.०२२ | शयेनाकारणें उत्तम स्थळें। जळें ठेवावीं सुसीतळें ।तांबोल गायनें रसाळें। रागरंगें करावीं |
| ०४.०७.०२३ | परिमळद्रव्यें आणी फुलेलें। नाना सुगंधेल तेलें ।खाद्य फळें बहुसालें। सन्निधचि असावी |
| ०४.०७.०२४ | सडे संमार्जनें करावीं। उदकपात्रें उदकें भरावीं ।वसनें प्रक्षालून आणावीं। उत्तमोत्तमें |
| ०४.०७.०२५ | सकळांचें करावें पारपत्य। आलयाचें करावें आतित्य ।ऐसी हे जाणावी सत्य। सातवी भक्ती |
| ०४.०७.०२६ | वचनें बोलावीं करुणेचीं। नाना प्रकारें स्तुतीचीं ।अंतरें निवती सकळांचीं। ऐसें वदावें |
| ०४.०७.०२७ | ऐसी हे सातवी भक्ती। निरोपिली येथामती ।प्रत्यक्ष न घडे तरी चित्तीं। मानसपूजा करावी |
| ०४.०७.०२८ | ऐसें दास्य करावें देवाचें। येणेंचि प्रकारें सद्गुरुचें ।प्रत्यक्ष न घडे तरी मानसपूजेचें। करित जावें |
| ०४.०८.००१ | मागां जालें निरूपण। सातवें भक्तीचें लक्षण ।आतां ऐका सावधान। आठवी भक्ती |
| ०४.०८.००२ | देवासी परम सख्य करावें। प्रेम प्रीतीनें बांधावें ।आठवें भक्तीचें जाणावें। लक्षण ऐसें |
| ०४.०८.००३ | देवास जयाची अत्यंत प्रीती। आपण वर्तावें तेणें रीतीं ।येणें करितां भगवंतीं। सख्य घडे नेमस्त |
| ०४.०८.००४ | भक्ति भाव आणी भजन। निरूपण आणी कथाकीर्तन ।प्रेमळ भक्तांचें गायन। आवडे देवा |
| ०४.०८.००५ | आपण तैसेंचि वर्तावें। आपणासि तेंच आवडावें ।मनासारिखें होतां स्वभावें। सख्य घडे नेमस्त |
| ०४.०८.००६ | देवाच्या सख्यत्वाकारणें। आपलें सौख्य सोडून देणें ।अनन्यभावें जीवें प्राणें। शरीर तेंहि वेंचावें |
| ०४.०८.००७ | सांडून आपली संसारवेथा। करित जावी देवाची चिंता ।निरूपण कीर्तन कथा वार्ता। देवाच्याचि सांगाव्या |
| ०४.०८.००८ | देवाच्या सख्यत्वासाठीं। पडाव्या जिवलगांसी तुटी ।सर्व अर्पावें सेवटीं । प्राण तोहि वेचावा |
| ०४.०८.००९ | आपुलें आवघें चि जावें। परी देवासीं सख्य राहावें ।ऐसी प्रीती जिवें भावें। भगवंतीं लागावी |
| ०४.०८.०१० | देव म्हणिजे आपुला प्राण। प्राणासी न करावें निर्वाण ।परम प्रीतीचें लक्षण। तें हें ऐसें असे |

| | |
|---|---|
| ०४.०८.०११ | ऐसें परम सख्य धरितां। देवास लागे भक्ताची चिंता ।पांडव लाखाजोहरीं जळतां। विवरद्वारें काढिले |
| ०४.०८.०१२ | देव सख्यत्वें राहे आपणासी। तें तों वर्म आपणाचि पासीं ।आपण वचनें बोलावीं जैसीं। तैसी येती पडसादें |
| ०४.०८.०१३ | आपण असतां अनन्यभावें। देव तत्काळचि पावे ।आपण त्रास घेतां जीवें। देवहि त्रासे |
| श्लोक ०४.०८.०१ | ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् |
| ०४.०८.०१४ | जैसें जयाचें भजन। तैसाचि देवहि आपण ।म्हणौन हें आवघें जाण। आपणाचि पासीं |
| ०४.०८.०१५ | आपुल्या मनासारिखें न घडे। तेणें गुणें निष्ठा मोडे ।तरी गोष्टी आपणाकडे। सहजचि आली |
| ०४.०८.०१६ | मेघ चातकावरी वोळेना। तरी चातक पालटेना ।चंद्र वेळेसी उगवेना। तऱ्ही चकोर अनन्य |
| ०४.०८.०१७ | ऐसें असावें सख्यत्व। विवेकें धरावें सत्व ।भगवंतावरील ममत्व। सांडूंचि नये |
| ०४.०८.०१८ | सखा मानावा भगवंत। माता पिता गण गोत ।विद्या लक्ष्मी धन वित्त। सकळ परमात्मा |
| ०४.०८.०१९ | देवावेगळें कोणीं नाहीं। ऐसें बोलती सर्वहि ।परंतु त्यांची निष्ठा कांहीं। तैसीच नसे |
| ०४.०८.०२० | म्हणौनि ऐसें न करावें। सख्य तरी खरेंचि करावें ।अंतरीं सदृढ धरावें। परमेश्वरासी |
| ०४.०८.०२१ | आपुलिया मनोगताकारणें। देवावरी क्रोधास येणें ।ऐसीं नव्हेत किं लक्षणें। सख्यभक्तीचीं |
| ०४.०८.०२२ | देवाचें जें मनोगत। तेंचि आपुलें उचित ।इच्छेसाठीं भगवंत। अंतरूं नये कीं |
| ०४.०८.०२३ | देवाचें इच्छेनें वर्तावें। देव करील तें मानावें ।मग सहजचि स्वभावें। कृपाळु देव |
| ०४.०८.०२४ | पाहातां देवाचें कृपेसी। मातेची कृपा कायेसी ।माता वधी बाळकासी। विपत्तिकाळीं |
| ०४.०८.०२५ | देवें भक्त कोण वधिला। कधीं देखिला ना ऐकिला ।शरणागतांस देव जाला। वज्रपंजरु |
| ०४.०८.०२६ | देव भक्तांचा कैवारी। देव पतितांसि तारी ।देव होये साहाकारी। अनाथांचा |
| ०४.०८.०२७ | देव अनाथांचा कैपक्षी। नाना संकटांपासून रक्षी ।धांविन्नला अंतरसाक्षी। गजेंद्राकारणें |
| ०४.०८.०२८ | देव कृपेचा सागरु। देव करुणेचा जळधरु ।देवासि भक्तांचा विसरु। पडणार नाहीं |
| ०४.०८.०२९ | देव प्रीती राखों जाणे। देवासी करावें साजणें ।जिवलगें आवघीं पिसुणें। कामा न येती |
| ०४.०८.०३० | सख्य देवाचें तुटेना। प्रीती देवाची विटेना ।देव कदा पालटेना। शरणागतांसी |
| ०४.०८.०३१ | म्हणौनि सख्य देवासी करावें। हितगुज तयासी सांगावें ।आठवे भक्तीचें जाणावें। लक्षण ऐसें |
| ०४.०८.०३२ | जैसा देव तैसा गुरु। शास्त्रीं बोलिला हा विचारु ।म्हणौन सख्यत्वाचा प्रकारु। सद्गुरुसीं असावा |
| ०४.०९.००१ | मागां जालें निरूपण। आठवे भक्तीचें लक्षण ।आतां ऐका सावधान। भक्ति नवमी |
| ०४.०९.००२ | नवमी निवेदन जाणावें। आत्मनिवेदन करावें ।तें हि सांगिजेल स्वभावें। प्रांजळ करूनि |

| | |
|---|---|
| ०४.०९.००३ | ऐका निवेदनाचें लक्षण। देवासि वाहावें आपण ।करावें तत्त्वविवरण। म्हणिजे कळे |
| ०४.०९.००४ | मी भक्त ऐसें म्हणावें। आणी विभक्तपणेंचि भजावें ।हें आवघेंचि जाणावें। विलक्षण |
| ०४.०९.००५ | लक्षण असोन विलक्षण। ज्ञान असोन अज्ञान ।भक्त असोन विभक्तपण। तें हें ऐसें |
| ०४.०९.००६ | भक्त म्हणिजे विभक्त नव्हे। आणी विभक्त म्हणिजे भक्त नव्हे ।विचारेंविण कांहींच नव्हे। समाधान |
| ०४.०९.००७ | तस्मात् विचार करावा। देव कोण तो वोळखावा ।आपला आपण शोध घ्यावा। अंतर्यामीं |
| ०४.०९.००८ | मी कोण ऐसा निवाडा। पाहों जातां तत्वझाडा ।विचार करितां उघडा। आपण नाहीं |
| ०४.०९.००९ | तत्वें तत्व जेव्हां सरे। तेव्हां आपण कैंचा उरे ।आत्मनिवेदन येणें प्रकारें। सहजचि जालें |
| ०४.०९.०१० | तत्वरूप सकळ भासे। विवेक पाहातां निरसे ।प्रकृतिनिरासें आत्मा असे। आपण कैंचा |
| ०४.०९.०११ | येक मुख्य परमेश्वरु। दुसरी प्रकृति जगदाकारु ।तिसरा आपण कैंचा चोरु। आणिला मधें |
| ०४.०९.०१२ | ऐसें हें सिद्धचि असतां। नाथिली लागे देहअहंता ।परंतु विचारें पाहों जातां। कांहींच नसे |
| ०४.०९.०१३ | पाहातां तत्त्वविवंचना। पिंडब्रह्मांडतत्वरचना ।विश्वाकारें वेक्ती नाना । तत्वें विस्तारली |
| ०४.०९.०१४ | तत्वें साक्षत्वें वोसरतीं। साक्षत्व नुरे आत्मप्रचिती ।आत्मा असे आदिअंतीं। आपण कैंचा |
| ०४.०९.०१५ | आत्मा एक स्वानंदघन। आणी अहमात्मा हें वचन ।तरी मग आपण कैंचा भिन्न। उरला तेथें |
| ०४.०९.०१६ | सोहं हंसा हें उत्तर। याचें पाहावें अर्थांतर ।पाहातां आत्मयाचा विचार। आपण कैंचा तेथें |
| ०४.०९.०१७ | आत्मा निर्गुण निरंजन। तयासी असावें अनन्य ।अनन्य म्हणिजे नाहीं अन्य। आपण कैंचा तेथें |
| ०४.०९.०१८ | आत्मा म्हणिजे तो अद्वैत। जेथें नाहीं द्वैताद्वैत ।तेथें मीपणाचा हेत। उरेल कैंचा |
| ०४.०९.०१९ | आत्मा पूर्णत्वें परिपूर्ण। जेथें नाहीं गुणागुण ।निखळ निर्गुणीं आपण। कोण कैंचा |
| ०४.०९.०२० | त्वंपद तत्पद असिपद। निरसुनि सकळ भेदाभेद ।वस्तु ठाईंची अभेद। आपण कैंचा |
| ०४.०९.०२१ | निरसितां जीवशिवउपाधी। जीवशिवचि कैंचें आधीं ।स्वरूपीं होतां दृढबुद्धि। आपण कैंचा |
| ०४.०९.०२२ | आपण मिथ्या साच देव। देव भक्त अनन्यभाव ।या वचनाचा अभिप्राव। अनुभवी जाणती |
| ०४.०९.०२३ | या नाव आत्मनिवेदन। ज्ञानियांचें समाधान ।नवमे भक्तीचें लक्षण। निरोपिलें |
| ०४.०९.०२४ | पंचभूतांमध्यें आकाश। सकळ देवांमध्यें जगदीश ।नवविधा भक्तीमधें विशेष। भक्ति नवमी |
| ०४.०९.०२५ | नवमी भक्ति आत्मनिवेदन। न होतां न चुके जन्ममरण ।हें वचन सत्य प्रमाण । अन्यथा नव्हे |
| ०४.०९.०२६ | ऐसी हे नवविधा भक्ती। केल्यां पाविजे सायोज्यमुक्ती ।सायोज्यमुक्तीस कल्पांतीं। चळण नाहीं |
| ०४.०९.०२७ | तिहीं मुक्तींस आहे चळण। सायोज्यमुक्ती अचळ जाण ।त्रैलोक्यास होतां निर्वाण। सायोज्यमुक्ती चळेना |

| | |
|---|---|
| ०४.०९.०२८ | आवघीया चत्वार मुक्ती। वेदशास्त्रें बोलती ।तयांमधें तीन नासती। चौथी ते अविनाश |
| ०४.०९.०२९ | पहिली मुक्ती ते स्वलोकता। दुसरी ते समीपता ।तिसरी ते स्वरूपता। चौथी सायोज्यमुक्ती |
| ०४.०९.०३० | ऐसिया चत्वार मुक्ती। भगवद्भजनें प्राणी पावती ।हेंचि निरूपण प्रांजळ श्रोतीं। सावध पुढें परिसावें |
| ०४.१०.००१ | मुळीं ब्रह्म निराकार। तेथें स्फूर्तिरूप अहंकार ।तो पंचभूतांचा विचार। ज्ञानदशकीं बोलिला |
| ०४.१०.००२ | तो अहंकार वायोरूप। तयावरी तेजाचें स्वरूप ।तया तेजाच्या आधारें आप। आवर्णोदक दाटलें |
| ०४.१०.००३ | तया आवर्णोदकाच्या आधारें। धरा धरिली फणिवरें ।वरती छपन्न कोटी विस्तारें। वसुंधरा हे |
| ०४.१०.००४ | इयेवरी परिघ सप्त सागर। मध्य मेरु माहां थोर ।अष्ट दिग्पाळ तो परिवार। अंतरें वेष्टित राहिला |
| ०४.१०.००५ | तो सुवर्णाचा माहा मेरू। पृथ्वीस तयाचा आधारु ।चौऱ्यासी सहस्र विस्तारु। रुंदी तयाची |
| ०४.१०.००६ | उंच तरी मर्यादेवेगळा। भूमीमधें सहस्र सोळा ।तया भोवता वेष्टित पाळा। लोकालोक पर्वताचा |
| ०४.१०.००७ | तया ऐलिकडे हिमाचळ। जेथें पांडव गळाले सकळ ।धर्म आणि तमाळनीळ। पुढें गेले |
| ०४.१०.००८ | जेथें जावया मार्ग नाहीं। मार्गीं पसरले माहा अही ।सितसुखें सुखावले ते हि। पर्वतरूप भासती |
| ०४.१०.००९ | तया ऐलिकडे सेवटीं जाण। बद्रिकाश्रम बद्रिनारायण ।तेथें माहां तापसी निर्वाण । देहत्यागार्थ जाती |
| ०४.१०.०१० | तया ऐलिकडे बद्रिकेदार। पाहोन येती लाहान थोर ।ऐसा हा अवघा विस्तार। मेरुपर्वताचा |
| ०४.१०.०११ | तया मेरुपर्वता पाठारीं। तीन श्रृंगें विषमहारी ।परिवारें राहिले तयावरी। ब्रह्मा विष्णु महेश |
| ०४.१०.०१२ | ब्रह्मश्रृंग तो पर्वताचा। विष्णुश्रृंग तो मर्गजाचा ।शिवश्रृंग तो स्फटिकाचा। कैळास नाम त्याचें |
| ०४.१०.०१३ | वैकुंठ नाम विष्णुश्रृंगाचें। सत्यलोक नाम ब्रह्मश्रृंगाचें ।अमरावती इंद्राचें। स्थळ खालतें |
| ०४.१०.०१४ | तेथें गण गंधर्व लोकपाळ। तेतिस कोटी देव सकळ ।चौदा लोक सुवर्णाचळ । वेष्टित राहिले |
| ०४.१०.०१५ | तेथें कामधेनूचीं खिलारें। कल्पतरूचीं बनें अपारें ।अमृताचीं सरोवरें। ठाईं ठाईं उचंबळती |
| ०४.१०.०१६ | तेथें उदंड चिंतामणी। हिरे परिसांचियां खाणी ।तेथें सुवर्णमये धरणी। लखलखायमान |
| ०४.१०.०१७ | परम रमणीये फांकती किळा। नव्वरत्नाचिया पाषाणसिळा ।तेथें अखंड हरुषवेळा। आनंदमये |
| ०४.१०.०१८ | तेथें अमृताची भोजनें। दिव्य गंधें दिव्य सुमनें ।अष्ट नायका गंधर्वगायनें। निरंतर |
| ०४.१०.०१९ | तेथें तारुण्य वोसरेना। रोगव्याधी हि असेना ।वृधाप्य आणी मरण येना। कदाकाळीं |
| ०४.१०.०२० | तेथें येकाहूनि येक सुंदर। तेथें येकाहूनि येक चतुर ।धीर उदार आणी शूर। मर्यादेवेगळे |
| ०४.१०.०२१ | तेथें दिव्यदेह ज्योतिरूपें। विद्युल्यतेसारिखीं स्वरूपें ।तेथें येश कीर्ति प्रतापें। सीमा सांडिली |
| ०४.१०.०२२ | ऐसें तें स्वर्गभुवन। सकळ देवांचें वस्तें स्थान ।तया स्थळाचें महिमान। बोलिजे तितुकें थोडें |

| | |
|---|---|
| ०४.१०.०२३ | येथें ज्या देवाचें भजन करावें। तेथें ते देवलोकीं राहावें ।स्वलोकता मुक्तीचें जाणावें। लक्षण ऐसें |
| ०४.१०.०२४ | लोकीं राहावें ते स्वलोकता। समीप असावें ते समीपता ।स्वरूप चि व्हावें ते स्वरूपता । तिसरी मुक्ती |
| ०४.१०.०२५ | देवस्वरूप जाला देही। श्रीवत्स कौस्तुभ लक्ष्मी नाहीं ।स्वरूपतेचें लक्षण पाहीं। ऐसें असे |
| ०४.१०.०२६ | सुकृत आहे तों भोगिती। सुकृत सरतांच ढकलून देती ।आपण देव ते असती। जैसे तैसे |
| ०४.१०.०२७ | म्हणोनि तिनी मुक्ति नासिवंत। सायोज्यमुक्ति ते शाश्वत ।तेहि निरोपिजेल सावचित्त। ऐक आतां |
| ०४.१०.०२८ | ब्रह्मांड नासेल कल्पांतीं। पर्वतासहित जळेल क्षिती ।तेव्हां अवघेच देव जाती। मां मुक्ति कैंच्या तेथें |
| ०४.१०.०२९ | तेव्हां निर्गुण परमात्मा निश्चळ। निर्गुण भक्ति तेहि अचळ ।सायोज्यमुक्ति ते केवळ। जाणिजे ऐसी |
| ०४.१०.०३० | निर्गुणीं अनन्य असतां। तेणें होये सायोज्यता ।सायोज्यता म्हणिजे स्वरूपता । निर्गुण भक्ती |
| ०४.१०.०३१ | सगुण भक्ति ते चळे। निर्गुण भक्ति ते न चळे ।हें आवघें प्रांजळ कळे। सद्गुरु केलियां |
| ०५.०१.००१ | जय जय जी सद्गुरु पूर्णकामा। परमपुरुषा आत्मयारामा ।अनुर्वाच्य तुमचा महिमा। वर्णिला नवचे |
| ०५.०१.००२ | जें वेदांस सांकडें। जें शब्दांसि कानडें ।तें सत्शिष्यास रोकडें। अलभ्य लाभे |
| ०५.०१.००३ | जें योगियांचें निजवर्म। जें शंकराचें निजधाम ।जें विश्रांतीचें निजविश्राम। परम गुह्य अगाध |
| ०५.०१.००४ | तें ब्रह्म तुमचेनि योगें। स्वयें आपणचि होईजे आंगें ।दुर्घट संसाराचेनि पांगें। पांगिजेना सर्वथा |
| ०५.०१.००५ | आतां स्वामिचेनि लडिवाळपणें। गुरुशिष्यांचीं लक्षणें ।सांगिजेती तेणें प्रमाणें । मुमुक्षें शरण जावें |
| ०५.०१.००६ | गुरु तों सकळांसी ब्राह्मण। जऱ्हीं तो जाला क्रियाहीन ।तरी तयासीच शरण। अनन्यभावें असावें |
| ०५.०१.००७ | अहो या ब्राह्मणाकारणें। आवतार घेतला नारायेणें ।विष्णूनें श्रीवत्स मिरविणें। तेथें इतर ते किती |
| ०५.०१.००८ | ब्राह्मणवचनें प्रमाण। होती शूद्रांचे ब्राह्मण ।धातुपाषाणीं देवपण। ब्राह्मणाचेनि मंत्रें |
| ०५.०१.००९ | मुंजीबंधनेंविरहित। तो शूद्रचि निभ्रांत ।द्विजन्मी म्हणोनि सतंत। द्विज ऐसें नाम त्याचें |
| ०५.०१.०१० | सकळांसि पूज्य ब्राह्मण। हे मुख्य वेदाज्ञा प्रमाण ।वेदविरहित तें अप्रमाण। अप्रिये भगवंता |
| ०५.०१.०११ | ब्राह्मणीं योग याग व्रतें दानें। ब्राह्मणीं सकळ तीर्थाटणें ।कर्ममार्ग ब्राह्मणाविणें। होणार नाहीं |
| ०५.०१.०१२ | ब्राह्मण वेद मूर्तिमंत। ब्राह्मण तोचि भगवंत ।पूर्ण होती मनोरथ। विप्रवाक्येंकरूनी |
| ०५.०१.०१३ | ब्राह्मणपूजनें शुद्ध वृत्ती । होऊन जडे भगवंतीं ।ब्राह्मणतीर्थें उत्तम गती। पावती प्राणी |
| ०५.०१.०१४ | लक्षभोजनीं पूज्य ब्राह्मण। आन यातिसि पुसे कोण ।परी भगवंतासी भाव प्रमाण। येरां चाड नाहीं |
| ०५.०१.०१५ | असो ब्राह्मणा सुरवर वंदिती। तेथें मानव बापुडें किती ।जरी ब्राह्मण मूढमती। तरी तो जगद्वंद्य |
| ०५.०१.०१६ | अंत्येज शब्दज्ञाता बरवा। परी तो नेऊन काये करावा ।ब्राह्मणासन्निध पुजावा। हें तों न घडे कीं |

| | |
|---|---|
| ०५.०१.०१७ | जें जनावेगळें केलें। तें वेदें अव्हेरिलें ।म्हणोनि तयासि नाम ठेविलें। पाषांडमत |
| ०५.०१.०१८ | असो जे हरिहरदास। तयास ब्राह्मणीं विस्वास ।ब्राह्मणभजनें बहुतांस। पावन केलें |
| ०५.०१.०१९ | ब्राह्मणें पाविजे देवाधिदेवा। तरी किमर्थ सद्गुरु करावा ।ऐसें म्हणाल तरी निजठेवा। सद्गुरुविण नाहीं |
| ०५.०१.०२० | स्वधर्मकर्मी पूज्य ब्राह्मण। परी ज्ञान नव्हे सद्गुरुविण ।ब्रह्मज्ञान नस्तां सीण। जन्ममृत्य चुकेना |
| ०५.०१.०२१ | सद्गुरुविण ज्ञान कांहीं। सर्वथा होणार नाहीं ।अज्ञान प्राणी प्रवाहीं। वाहातचि गेले |
| ०५.०१.०२२ | ज्ञानविरहित जें जें केलें। तें तें जन्मासि मूळ जालें ।म्हणौनि सद्गुरुचीं पाऊलें। सुधृढ धरावी |
| ०५.०१.०२३ | जयास वाटे देव पाहावा। तेणें सत्संग धरावा ।सत्संगेंविण देवाधिदेवा। पाविजेत नाहीं |
| ०५.०१.०२४ | नाना साधनें बापुडीं। सद्गुरुविण करिती वेडीं ।गुरुकृपेविण कुडकुडीं। वेर्थचि होती |
| ०५.०१.०२५ | कार्तिकस्नानें माघस्नानें। व्रतें उद्यापनें दानें ।गोरांजनें धूम्रपानें। साधिती पंचाग्नी |
| ०५.०१.०२६ | हरिकथा पुराणश्रवण। आदरें करिती निरूपण ।सर्व तीर्थें परम कठिण। फिरती प्राणी |
| ०५.०१.०२७ | झळफळित देवतार्चनें। स्नानें संध्या दर्भासनें ।टिळे माळा गोपीचंदनें। ठसे श्रीमुद्रांचे |
| ०५.०१.०२८ | अर्घ्यपात्रें संपुष्ट गोकर्णें। मंत्रयंत्रांचीं तांब्रपर्णें ।नाना प्रकारीचीं उपकर्णें। साहित्यशोभा |
| ०५.०१.०२९ | घंटा घणघणा वाजती। स्तोत्रें स्तवनें आणी स्तुती ।आसनें मुद्रा ध्यानें करिती। प्रदक्षणा नमस्कार |
| ०५.०१.०३० | पंचायेत्न पूजा केली। मृत्तिकेचीं लिंगें लाखोली ।बेलें नारिकेळें भरिली। संपूर्ण सांग पूजा |
| ०५.०१.०३१ | उपोषणें निष्ठा नेम। परम सायासीं केलें कर्म ।फळचि पावती वर्म । चुकले प्राणी |
| ०५.०१.०३२ | येज्ञादिकें कर्में केलीं। हृदईं फळाशा कल्पिली ।आपले इछेनें घेतली। सूति जन्माची |
| ०५.०१.०३३ | करूनि नाना सायास। केला चौदा विद्यांचा अभ्यास ।रिद्धि सिद्धि सावकास। वोळल्या जरी |
| ०५.०१.०३४ | तरी सद्गुरुकृपेविरहित। सर्वथा न घडे स्वहित ।येमपुरीचा अनर्थ। चुकेना येणें |
| ०५.०१.०३५ | जव नाहीं ज्ञानप्राप्ती। तव चुकेना यातायाती ।गुरुकृपेविण अधोगती। गर्भवास चुकेना |
| ०५.०१.०३६ | ध्यान धारणा मुद्रा आसन। भक्ती भाव आणी भजन ।सकळ हि फोल ब्रह्मज्ञान । जव तें प्राप्त नाहीं |
| ०५.०१.०३७ | सद्गुरुकृपा न जोडे। आणी भलती च कडे वावडे ।जैसें आंधळें चाचरोन पडे। गारीं आणी गडधरां |
| ०५.०१.०३८ | जैसें नेत्रीं घालितां अंजन। पडे दृष्टीस निधान ।तैसें सद्गुरुवचनें ज्ञान । प्रकाश होये |
| ०५.०१.०३९ | सद्गुरुविण जन्म निर्फळ। सद्गुरुविण दुःख सकळ ।सद्गुरुविण तळमळ। जाणार नाहीं |
| ०५.०१.०४० | सद्गुरुचेनि अभयंकरें। प्रगट होइजे ईश्वरें ।संसारदुःखें अपारें। नासोन जाती |
| ०५.०१.०४१ | मागें जाले थोर थोर। संत महंत मुनेश्वर ।तयांस हि ज्ञानविज्ञानविचार। सद्गुरुचेनी |

| | |
|---|---|
| ०५.०१.०४२ | श्रीरामकृष्ण आदिकरूनी। अति तत्पर गुरुभजनीं ।सिद्ध साधु आणी संतजनीं। गुरुदास्य केलें |
| ०५.०१.०४३ | सकळ सृष्टीचें चाळक। हरिहरब्रह्मादिक ।तेही सद्गुरुपदीं रंक। महत्वा न चढेती |
| ०५.०१.०४४ | असो जयासि मोक्ष व्हावा। तेणें सद्गुरु करावा ।सद्गुरुविण मोक्ष पावावा। हें कल्पांतीं न घडे |
| ०५.०१.०४५ | आतां सद्गुरु ते कैसे। नव्हेति इतरां गुरु ऐसे ।जयांचे कृपेनें प्रकाशे। शुद्ध ज्ञान |
| ०५.०१.०४६ | त्या सद्गुरुची वोळखण। पुढिले समासीं निरूपण ।बोलिलें असे श्रोतीं श्रवण। अनुक्रमें करावें |
| ०५.०२.००१ | जे करामती दाखविती। ते हि गुरु म्हणिजेती ।परंतु सद्गुरु नव्हेती। मोक्षदाते |
| ०५.०२.००२ | सभामोहन भुररीं चेटकें। साबरमंत्र कौटालें अनेकें ।नाना चमत्कार कौतुकें। असंभाव्य सांगती |
| ०५.०२.००३ | सांगती औषधीप्रयोग। कां सुवर्णधातूचा मार्ग ।दृष्टिबंधनें लागवेग। अभिळाषाचा |
| ०५.०२.००४ | साहित संगीत रागज्ञान। गीत नृत्य तान मान ।नाना वाद्यें सिकविती जन। ते हि येक गुरु |
| ०५.०२.००५ | विद्या सिकविती पंचाक्षरी। ताडेतोडे नानापरी ।कां पोट भरे जयावरी। ते विद्या सिकविती |
| ०५.०२.००६ | जे यातीचा जो व्यापार। सिकविती भरावया उदर ।ते हि गुरु परी साचार । सद्गुरु नव्हेती |
| ०५.०२.००७ | आपली माता आणी पिता। ते हि गुरुचि तत्वतां ।परी पैलपार पावविता। तो सद्गुरु वेगळा |
| ०५.०२.००८ | गाईत्रीमंत्राचा उचारु। सांगे तो साचार कुळगुरु ।परी ज्ञानेंविण पैलपारु। पाविजेत नाहीं |
| ०५.०२.००९ | जो ब्रह्मज्ञान उपदेसी। अज्ञानअंधारें निरसी ।जीवात्मयां परमात्मयांसी। ऐक्यता करी |
| ०५.०२.०१० | विघडले देव आणी भक्त। जीवशिवपणें द्वैत ।तया देवभक्ता येकांत । करी तो सद्गुरु |
| ०५.०२.०११ | भवव्याघ्रें घालूनि उडी। गोवत्सास तडातोडी ।केली देखोनि सीघ्र सोडी। तो सद्गुरु जाणावा |
| ०५.०२.०१२ | प्राणी मायाजाळीं पडिलें। संसारदुःखें दुःखवलें ।ऐसें जेणें मुक्त केलें। तो सद्गुरु जाणावा |
| ०५.०२.०१३ | वासनानदीमाहांपुरीं। प्राणी बुडतां ग्लांती करी ।तेथें उडी घालूनि तारी। तो सद्गुरु जाणावा |
| ०५.०२.०१४ | गर्भवास अति सांकडी। इछाबंधनाची बेडी ।ज्ञान देऊन सीघ्र सोडी। तो सद्गुरु स्वामी |
| ०५.०२.०१५ | फोडूनि शब्दाचें अंतर। वस्तु दाखवी निजसार ।तोचि गुरु माहेर। अनाथांचें |
| ०५.०२.०१६ | जीव येकदेसी बापुडें। तयास ब्रह्म चि करी रोकडें ।फेडी संसारसांकडें । वचनमात्रें |
| ०५.०२.०१७ | जें वेदांचे अभ्यांतरीं। तें काढून अपत्यापरी ।शिष्यश्रवणीं कवळ भरी। उद्गारवचनें |
| ०५.०२.०१८ | वेद शास्त्र माहानुभाव। पाहातां येकचि अनुभव ।तोचि येक गुरुराव। ऐक्यरूपें |
| ०५.०२.०१९ | संदेह निःशेष जाळी। स्वधर्म आदरें प्रतिपाळी ।वेदविरहित टवाळी। करूंच नेणे |
| ०५.०२.०२० | जें जें मन अंगिकारी। तें तें स्वयें मुक्त करी ।तो गुरु नव्हे भिकारी । झडे आला |

| | |
|---|---|
| ०५.०२.०२१ | शिष्यास न लविती साधन। न करविती इंद्रियेंदमन ।ऐसे गुरु आडक्याचे तीन। मिळाले तरी त्यजावे |
| ०५.०२.०२२ | जो कोणी ज्ञान बोधी। समूळ अविद्या छेदी ।इंद्रियेंदमन प्रतिपादी। तो सद्गुरु जाणावा |
| ०५.०२.०२३ | येक द्रव्याचे विकिले। येक शिष्याचे आखिले ।अति दुराशेनें केले। दीनरूप |
| ०५.०२.०२४ | जें जें रुचे शिष्या मनीं। तैसीच करी मनधरणी ।ऐसी कामना पापिणी। पडली गळां |
| ०५.०२.०२५ | जो गुरु भीडसारु। तो अद्धमाहून अद्धम थोरु ।चोरटा भैंद पामरु। द्रव्यभोंदु |
| ०५.०२.०२६ | जैसा वैद्य दुराचारी। केली सर्वस्वें बोहरी ।आणी सेखीं भीड करी। घातघेणा |
| ०५.०२.०२७ | तैसा गुरु नसावा। जेणें अंतर पडे देवा ।भीड करूनियां गोवा । घाली बंधनाचा |
| ०५.०२.०२८ | जेथें शुद्ध ब्रह्मज्ञान। आणी स्थूळ क्रियेचें साधन ।तोचि सद्गुरु निधान। दाखवी डोळां |
| ०५.०२.०२९ | देखणें दाखविती आदरें। मंत्र फुंकिती कर्णद्वारें ।इतुकेंच ज्ञान तें पामरें । अंतरलीं भगवंता |
| ०५.०२.०३० | बाणे तिहींची खूण। तोचि गुरु सुलक्षण ।तेथेंचि रिघावें शरण। अत्यादरें मुमुक्षें |
| ०५.०२.०३१ | अद्वैत निरूपणें अगाध वक्ता। परी विषईं लोलंगता ।ऐसिया गुरूचेनि सार्थकता। होणार नाहीं |
| ०५.०२.०३२ | जैसा निरूपणसमयो। तैसेंचि मनहि करी वायो ।कृतबुद्धीचा जयो। जालाच नाहीं |
| ०५.०२.०३३ | निरूपणीं सामर्थ्य सिद्धी। श्रवण होतां दुराशा बाधी ।नाना चमत्कारें बुद्धी। दंडळूं लागे |
| ०५.०२.०३४ | पूर्वीं ज्ञाते विरक्त भक्त। तयांसि सादृश्य भगवंत ।आणी सामर्थ्यहि अद्भुत। सिद्धीचेनि योगें |
| ०५.०२.०३५ | ऐसें तयांचें सामर्थ्य। आमुचें ज्ञानचि नुसदें वेर्थ ।ऐसा सामर्थ्याचा स्वार्थ। अंतरीं वसे |
| ०५.०२.०३६ | निशेष दुराशा तुटे। तरीच भगवंत भेटे ।दुराशा धरिती ते वोखटें। शब्दज्ञाते कामिक |
| ०५.०२.०३७ | बहुत ज्ञातीं नागवलीं। कामनेनें वेडीं केलीं ।कामना इच्छितांच मेलीं। बापुडीं मूर्खें |
| ०५.०२.०३८ | निशेष कामनारहित। ऐसा तो विरुळा संत ।अवघ्यां वेगळें मत। अक्षै ज्याचें |
| ०५.०२.०३९ | अक्षै ठेवा सकळांचा। परी पांगडा फिटेना शरीराचा ।तेणें मार्ग ईश्वराचा। चुकोनि जाती |
| ०५.०२.०४० | सिद्धि आणी सामर्थ्य जालें। सामर्थ्यें देहास महत्त्व आलें ।तेणें बेंचाड बळकावलें। देहबुद्धीचें |
| ०५.०२.०४१ | सांडूनि अक्षै सुख। सामर्थ्य इछिती ते मूर्ख ।कामनेसारिखें दुःख। आणीक कांहींच नाहीं |
| ०५.०२.०४२ | ईश्वरेंविण जे कामना। तेणेंचि गुणें नाना यातना ।पावती होती पतना । वरपडे प्राणी |
| ०५.०२.०४३ | होतां शरीरासी अंत। सामर्थ्य हि निघोन जात ।सेखीं अंतरला भगवंत। कामनागुणें |
| ०५.०२.०४४ | म्हणोनि निःकामताविचारु। दृढबुद्धीचा निर्धारु ।तोचि सद्गुरु पैलपारु। पाववी भवाचा |
| ०५.०२.०४५ | मुख्य सद्गुरुचें लक्षण। आधीं पाहिजे विमळ ज्ञान ।निश्चयाचें समाधान। स्वरूपस्थिती |

| | |
|---|---|
| ०५.०२.०४६ | याहिवरी वैराग्य प्रबळ। वृत्ति उदास केवळ ।विशेष आचारें निर्मळ। स्वधर्मविषईं |
| ०५.०२.०४७ | याहिवरी अध्यात्मश्रवण। हरिकथा निरूपण ।जेथें परमार्थविवरण। निरंतर |
| ०५.०२.०४८ | जेथें सारासारविचार। तेथें होये जगोद्धार ।नवविधा भक्तीचा आधार। बहुतां जनासी |
| ०५.०२.०४९ | म्हणोनि नवविधा भजन। जेथें प्रतिष्ठलें साधन ।हें सद्गुरुचें लक्षण। श्रोतीं वोळखावें |
| ०५.०२.०५० | अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान। बाह्य निष्ठेचें भजन ।तेथें बहु भक्त जन। विश्रांति पावती |
| ०५.०२.०५१ | नाहीं उपासनेचा आधार। तो परमार्थ निराधार ।कर्मेंविण अनाचार। भ्रष्ट होती |
| ०५.०२.०५२ | म्हणोनि ज्ञान वैराग्य आणि भजन। स्वधर्मकर्म आणि साधन ।कथा निरूपण श्रवण मनन। नीति न्याये मर्यादा |
| ०५.०२.०५३ | यामधें येक उणें असे। तेणें तें विलक्षण दिसे ।म्हणौन सर्व हि विलसे। सद्गुरुपासीं |
| ०५.०२.०५४ | तो बहुतांचें पाळणकर्ता। त्यास बहुतांची असे चिंता ।नाना साधनें समर्था। सद्गुरुपासीं |
| ०५.०२.०५५ | साधनेंविण परमार्थ प्रतिष्ठे। तो मागुतां सवेंच भ्रष्टे ।याकारणें दुरीद्रष्टे। माहानुभाव |
| ०५.०२.०५६ | आचार उपासना सोडिती। ते भ्रष्ट अभक्त दिसती ।जळो तयांची महंती। कोण पुसे |
| ०५.०२.०५७ | कर्म उपासनेचा अभाव। तेथें भकाधेसि जाला ठाव ।तो कानकोंडा समुदाव। प्रपंची हांसती |
| ०५.०२.०५८ | नीच यातीचा गुरु। तो हि कानकोंडा विचारु ।ब्रह्मसभेस जैसा चोरु। तैसा दडे |
| ०५.०२.०५९ | ब्रह्मसभे देखतां। त्याचें तीर्थ नये घेतां ।अथवा प्रसाद सेवितां। प्राश्चित पडे |
| ०५.०२.०६० | तीर्थप्रसादाची सांडी केली। तेथें नीचता दिसोन आली ।गुरुभक्ति ते सटवली। येकायेकी |
| ०५.०२.०६१ | गुरुची मर्यादा राखतां। ब्राह्मण क्षोभती तत्वतां ।तेथें ब्राह्मण्य रक्षूं जातां। गुरुक्षोभ घडे |
| ०५.०२.०६२ | ऐसीं सांकडीं दोहींकडे। तेथें प्रस्तावा घडे ।नीच यातीस गुरुत्व न घडे। याकारणें |
| ०५.०२.०६३ | तथापि आवडी घेतली जीवें। तरी आपणचि भ्रष्टावें ।बहुत जनांसी भ्रष्टवावें। हें तों दूषणचि कीं |
| ०५.०२.०६४ | आतां असो हा विचारु। स्वयातीचा पाहिजे गुरु ।नाहीं तरी भ्रष्टाकारु। नेमस्त घडे |
| ०५.०२.०६५ | जे जे कांहीं उत्तम गुण। तें तें सद्गुरुचें लक्षण ।तथापि सागों वोळखण। होये जेणें |
| ०५.०२.०६६ | येक गुरु येक मंत्रगुरु। येक यंत्रगुरु येक तांत्रगुरु ।येक वस्तादगुरु येक राजगुरु। म्हणती जनीं |
| ०५.०२.०६७ | येक कुळगुरु येक मानिला गुरु। येक विद्यागुरु येक कुविद्यागुरु ।येक असद्गुरु येक यातिगुरु। दंडकर्ते |
| ०५.०२.०६८ | येक मातागुरु येक पितागुरु। येक राजागुरु येक देवगुरु ।येक बोलिजे जगद्गुरु। सकळकळा |
| ०५.०२.०६९ | ऐसे हे सत्रा गुरु। याहिवेगळे आणीक गुरु ।ऐक तयांचा विचारु। सांगिजेल |
| ०५.०२.०७० | येक स्वप्नगुरु येक दीक्षागुरु। येक म्हणती प्रतिमागुरु ।येक म्हणती स्वयें गुरु। आपला आपण |

| | |
|---|---|
| ०५.०२.०७१ | जे जे यातीचा जो व्यापारु। ते ते त्याचे तितुके गुरु ।याचा पाहातां विचारु। उदंड आहे |
| ०५.०२.०७२ | असो ऐसे उदंड गुरु। नाना मतांचा विचारु ।परी जो मोक्षदाता सद्गुरु। तो वेगळाचि असे |
| ०५.०२.०७३ | नाना सद्विद्येचे गुण। याहिवरी कृपाळूपण ।हें सद्गुरुचें लक्षण। जाणिजे श्रोतीं |
| ०५.०३.००१ | मागां सद्गुरूचें लक्षण। विशद केलें निरूपण ।आतां सच्छिष्याची वोळखण। सावध ऐका |
| ०५.०३.००२ | सद्गुरुविण सच्छिष्य। तो वायां जाय निशेष ।कां सच्छिष्येंविण विशेष। सद्गुरु सिणे |
| ०५.०३.००३ | उत्तम भूमि शोधिली शुद्ध। तेथें बीज पेरिलें किडखाद ।कां तें उत्तम बीज परी समंध। खडकेंसी पडिला |
| ०५.०३.००४ | तैसा सच्छिष्य तें सत्पात्र। परंतु गुरु सांगे मंत्र तंत्र ।तेथें अरत्र ना परत्र। कांहींच नाहीं |
| ०५.०३.००५ | अथवा गुरु पूर्ण कृपा करी। परी शिष्य अनाधिकारी ।भाग्यपुरुषाचा भिकारी। पुत्र जैसा |
| ०५.०३.००६ | तैसें येकाविण येक। होत असे निरार्थक ।परलोकींचें सार्थक। तें दुऱ्हावे |
| ०५.०३.००७ | म्हणौनि सद्गुरु आणी सच्छिष्य। तेथें न लगती सायास ।त्या उभयतांचा हव्यास। पुरे येकसरा |
| ०५.०३.००८ | सुभूमि आणी उत्तम कण। उगवेना प्रजन्येंविण ।तैसें अध्यात्मनिरूपण। नस्तां होये |
| ०५.०३.००९ | सेत पेरिलें आणी उगवलें। परंतु निगेविण गेलें ।साधनेंविण तैसें जालें। साधकांसी |
| ०५.०३.०१० | जंवरी पीक आपणास भोगे। तंवरी अवघेंचि करणें लागे ।पीक आलियां हि उगें । राहोंचि नये |
| ०५.०३.०११ | तैसें आत्मज्ञान जालें। परी साधन पाहिजे केलें ।येक वेळ उदंड जेविलें। तऱ्हीं सामग्री पाहिजे |
| ०५.०३.०१२ | म्हणौन साधन अभ्यास आणी सद्गुरू। सच्छिष्य आणी सच्छास्त्रविचारु ।सत्कर्म सद्वासना पारु । पाववी भवाचा |
| ०५.०३.०१३ | सदुपासना सत्कर्म। सत्क्रिया आणी स्वधर्म ।सत्संग आणी नित्य नेम। निरंतर |
| ०५.०३.०१४ | ऐसें हें अवघें चि मिळे। तरीच विमळ ज्ञान निवळे ।नाहीं तरी पाषांड संचरें बळें। समुदाईं |
| ०५.०३.०१५ | येथें शब्द नाहीं शिष्यासी। हें अवघें सद्गुरुपासीं ।सद्गुरु पालटी अवगुणासी। नाना येत्नेंकरूनी |
| ०५.०३.०१६ | सद्गुरुचेनि असच्छिष्य पालटे। परंतु सच्छिष्यें असद्गुरु न पालटे ।कां जें थोरपण तुटे। म्हणौनियां |
| ०५.०३.०१७ | याकारणें सद्गुरु पाहिजे। तरीच सन्मार्ग लाहिजे ।नाहीं तरी होईजे। पाषांडा वरपडे |
| ०५.०३.०१८ | येथें सद्गुरुचि कारण। येर सर्व निःकारण ।तथापि सांगों वोळखण। सच्छिष्याची |
| ०५.०३.०१९ | मुख्य सच्छिष्याचें लक्षण। सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण ।अनन्यभावें शरण। त्या नांव सच्छिष्य |
| ०५.०३.०२० | शिष्य पाहिजे निर्मळ। शिष्य पाहिजे आचारसीळ ।शिष्य पाहिजे केवळ। विरक्त अनुतापी |
| ०५.०३.०२१ | शिष्य पाहिजे निष्ठावंत। शिष्य पाहिजे सुचिष्मंत ।शिष्य पाहिजे  नेमस्त। सर्वप्रकारीं |
| ०५.०३.०२२ | शिष्य पाहिजे साक्षपी विशेष। शिष्य पाहिजे परम दक्ष ।शिष्य पाहिजे अलक्ष। लक्षी ऐसा |

| | |
|---|---|
| ०५.०३.०२३ | शिष्य पाहिजे अति धीर। शिष्य पाहिजे अति उदार ।शिष्य पाहिजे अति तत्पर। परमार्थविषईं |
| ०५.०३.०२४ | शिष्य पाहिजे परोपकारी। शिष्य पाहिजे निर्मत्सरी ।शिष्य पाहिजे अर्थांतरीं। प्रवेशकर्ता |
| ०५.०३.०२५ | शिष्य पाहिजे परम शुद्ध। शिष्य पाहिजे परम सावध ।शिष्य पाहिजे अगाध। उत्तम गुणांचा |
| ०५.०३.०२६ | शिष्य पाहिजे प्रज्ञावंत। शिष्य पाहिजे प्रेमळ भक्त ।शिष्य पाहिजे नीतिवंत। मर्यादेचा |
| ०५.०३.०२७ | शिष्य पाहिजे युक्तिवंत। शिष्य पाहिजे बुद्धिवंत ।शिष्य पाहिजे संतासंत। विचारघेता |
| ०५.०३.०२८ | शिष्य पाहिजे धारिष्टाचा। शिष्य पाहिजे दृढ व्रताचा ।शिष्य पाहिजे उत्तम कुळीचा। पुण्यसीळ |
| ०५.०३.०२९ | शिष्य असावा सात्विक। शिष्य असावा भजक ।शिष्य असावा साधक। साधनकर्ता |
| ०५.०३.०३० | शिष्य असावा विश्वासी। शिष्य असावा कायाक्लेशी ।शिष्य असावा परमार्थासी। वाढऊं जाणे |
| ०५.०३.०३१ | शिष्य असावा स्वतंत्र। शिष्य असावा जगमित्र ।शिष्य असावा सत्पात्र। सर्व गुणें |
| ०५.०३.०३२ | शिष्य असावा सद्विद्येचा। शिष्य असावा सद्भावाचा ।शिष्य असावा अंतरींचा। परम शुद्ध |
| ०५.०३.०३३ | शिष्य नसावा अविवेकी। शिष्य नसावा गर्भसुखी ।शिष्य असावा संसारदुःखी। संतप्त देही |
| ०५.०३.०३४ | जो संसारदुःखें दुःखवला। जो त्रिविधतापें पोळला ।तोचि अधिकारी  जाला। परमार्थविषीं |
| ०५.०३.०३५ | बहु दुःख भोगिलें जेणें। तयासीच परमार्थ बाणे ।संसारदुःखाचेनि गुणें। वैराग्य उपजे |
| ०५.०३.०३६ | जया संसाराचा त्रास। तयासीच उपजे विस्वास ।विस्वासबळें दृढ कास। धरिली सद्गुरूची |
| ०५.०३.०३७ | अविस्वासें कास सोडिली। ऐसीं बहुतेक भवीं बुडालीं ।नाना जळचरीं तोडिलीं। मध्येंचि सुखदुःखें |
| ०५.०३.०३८ | या कारणें दृढ विस्वास। तोचि जाणावा सच्छिष्य ।मोक्षाधिकारी विशेष। आग्रगण्यु |
| ०५.०३.०३९ | जो सद्गुरुवचनें निवाला। तो सायोज्यतेचा आंखिला ।संसारपांगें पांगिला। न वचे कदा |
| ०५.०३.०४० | सद्गुरुहून देव मोठा। जयास वाटे तो करंटा ।सुटला वैभवाचा फांटा। सामर्थ्यपिसें |
| ०५.०३.०४१ | सद्गुरुस्वरूप तें संत। आणी देवांस मांडेल कल्पांत ।तेथें कैचें उरेल सामर्थ्य। हरिहरांचें |
| ०५.०३.०४२ | म्हणौन सद्गुरुसामर्थ्य आधीक। जेथें आटती ब्रह्मादिक ।अल्पबुद्धी मानवी रंक। तयांसी हें कळेना |
| ०५.०३.०४३ | गुरुदेवांस बराबरी । करी तो शिष्य दुराचारी ।भ्रांति बैसली अभ्यांतरीं। सिद्धांत नेणवे |
| ०५.०३.०४४ | देव मनुषीं भाविला। मंत्रीं देवपणासी आला ।सद्गुरु न वचे कल्पिला। ईश्वराचेनी |
| ०५.०३.०४५ | म्हणौनि सद्गुरु पूर्णपणें। देवाहून आधीक कोटिगुणें ।जयासि वर्णितां भांडणें। वेदशास्त्रीं लागलीं |
| ०५.०३.०४६ | असो सद्गुरुपदापुढें। दुजें कांहींच न चढे ।देवसामर्थ्य तें केवढें। मायाजनित |
| ०५.०३.०४७ | अहो सद्गुरुकृपा जयासी। सामर्थ्य न चले तयापासीं ।ज्ञानबळें वैभवासी।  तृणतुछ केलें |

| | |
|---|---|
| ०५.०३.०४८ | सद्गुरुकृपेचेनि बळें। अपरोक्षज्ञानाचेनि उसाळें ।मायेसहित ब्रह्मांड सगळें। दृष्टीस न ये |
| ०५.०३.०४९ | ऐसें सच्छिष्याचें वैभव। सद्गुरुवचनीं दृढ भाव ।तेणें गुणें देवराव। स्वयेंचि होती |
| ०५.०३.०५० | अंतरीं अनुतापें तापले। तेणें अंतर शुद्ध जालें ।पुढें सद्गुरुवचनें निवाले। सच्छिष्य ऐसे |
| ०५.०३.०५१ | लागतां सद्गुरुवचनपंथें। जालें ब्रह्मांड पालथें ।तरी जयाच्या शुद्ध भावार्थें। पालट न धरिजे |
| ०५.०३.०५२ | शरण सद्गुरूस गेले। सच्छिष्य ऐसे निवडले ।क्रियापालटें जाले। पावन ईश्वरीं |
| ०५.०३.०५३ | ऐसा सद्भाव अंतरीं। तेचि मुक्तीचे वाटेकरी ।येर माईक वेषधारी। असच्छिष्य |
| ०५.०३.०५४ | वाटे विषयांचें सुख। परमार्थ संपादणें लौकिक ।देखोवेखीं पढतमूर्ख। शरण गेले |
| ०५.०३.०५५ | जाली विषईं वृत्ति अनावर। दृढ धरिला संसार ।परमार्थचर्चेचा विचार। मळिण जाला |
| ०५.०३.०५६ | मोड घेतला परमार्थाचा। हव्यास धरिला प्रपंचाचा ।भार वाहिला कुटुंबाचा। काबाडी जाला |
| ०५.०३.०५७ | मानिला प्रपंचीं आनंद। केला परमार्थी विनोद ।भ्रांत मूढ मतिमंद। लोधला कामीं |
| ०५.०३.०५८ | सूकर पूजिलें विलेपनें। म्हैसा मर्दिला चंदनें ।तैसा विषई ब्रह्मज्ञानें। विवेकें बोधिला |
| ०५.०३.०५९ | रासभ उकरडां लोळे। तयासि परिमळसोहळे ।उलूक अंधारीं पळे। तया केवी हंसपंगती |
| ०५.०३.०६० | तैसा विषयदारींचा बराडी। घाली अध:पतनीं उडी ।तयास भगवंत आवडी। सत्संग कैंचा |
| ०५.०३.०६१ | वर्ती करून दांताळी। स्वानपुत्र हाडें चगळी ।तैसा विषई तळमळी। विषयसुखाकारणें |
| ०५.०३.०६२ | तया स्वानमुखीं परमान्न। कीं मर्कटास सिंहासन ।तैसें विषयशक्तां ज्ञान। जिरेल कैंचें |
| ०५.०३.०६३ | रासभें राखतां जन्म गेला। तो पंडितांमध्यें प्रतिष्ठिला ।न वचे तैसा आशक्ताला। परमार्थ नाहीं |
| ०५.०३.०६४ | मिळाला राजहंसांचा मेळा। तेथें आला डोंबकावळा ।लक्षून विष्ठेचा गोळा। हंस म्हणवी |
| ०५.०३.०६५ | तैसे सज्जनाचे संगती। विषई सज्जन म्हणविती ।विषय आमेद्य चित्तीं। गोळा लक्षिला |
| ०५.०३.०६६ | काखे घेऊनियां दारा। म्हणे मज संन्यासी करा ।तैसा विषई सैरावैरा। ज्ञान बडबडी |
| ०५.०३.०६७ | असो ऐसे पढतमूर्ख। ते काय जाणती अद्वैतसुख ।नारकी प्राणी नर्क। भोगिती स्वइच्छा |
| ०५.०३.०६८ | वैषेची करील सेवा। तो कैसा मंत्री म्हणावा ।तैसा विषयदास मानावा। भक्तराज केवी |
| ०५.०३.०६९ | तैसें विषई बापुडे। त्यांस ज्ञान कोणीकडे ।वाचाळ शाब्दिक बडबडे। वरपडे जाले |
| ०५.०३.०७० | ऐसे शिष्य परम नष्ट। कनिष्ठांमधें कनिष्ठ ।हीन अविवेकी आणी दृष्ट। खळ खोटे दुर्जन |
| ०५.०३.०७१ | ऐसे जे पापरूप। दीर्घदोषी वज्रलेप ।तयांस प्राश्चीत अनुताप । उद्भवतां आहे |
| ०५.०३.०७२ | तेंहि पुन्हां शरण जावें। सद्गुरूस संतोषवावें ।कृपादृष्टी जालियां व्हावें। पुन्हां शुद्ध |

| ०५.०३.०७३ | स्वामीद्रोह जया घडे। तो यावश्चंद्र नरकीं पडे ।तयास उपावचि न घडे। स्वामी तुष्टल्यावांचुनी |
|---|---|
| ०५.०३.०७४ | स्मशानवैराग्य आलें। म्हणोन लोटांगण घातलें ।तेणें गुणें उपतिष्ठलें । नाहीं ज्ञान |
| ०५.०३.०७५ | भाव आणिला जायाचा। मंत्र घेतला गुरूचा ।शिष्य जाला दों दिसांचा। मंत्राकारणें |
| ०५.०३.०७६ | ऐसे केले गुरु उदंड। शब्द सिकला पाषांड ।जाला तोंडाळ तर्मुंड। महापाषांडी |
| ०५.०३.०७७ | घडी येक रडे आणी पडे। घडी येक वैराग्य चढे ।घडी येक अहंभाव जडे। ज्ञातेपणाचा |
| ०५.०३.०७८ | घडी येक विस्वास धरी। सवें च घडी येक गुर्गुरी ।ऐसे नाना छंद करी। पिसाट जैसा |
| ०५.०३.०७९ | काम क्रोध मद मत्सर। लोभ मोह नाना विकार ।अभिमान कापट्य तिरस्कार। हृदईं नांदती |
| ०५.०३.०८० | अहंकार आणी देहपांग। अनाचार आणी विषयसंग ।संसार प्रपंच उद्वेग। अंतरीं वसे |
| ०५.०३.०८१ | दीर्घसूत्री कृतघ्न पापी। कुकर्मी कुतर्की विकल्पी ।अभक्त अभाव सीघ्रकोपी। निष्ठुर परघातक |
| ०५.०३.०८२ | हृदयेंसुन्य आणी आळसी। अविवेकी आणि अविस्वासी ।अधीर अविचार संदेहासी । दृढ धर्ता |
| ०५.०३.०८३ | आशा ममता तृष्णा कल्पना। कुबुद्धी दुर्वृत्ति दुर्वासना ।अल्पबुद्धि विषयकामना। हृदईं वसे |
| ०५.०३.०८४ | ईषणा असूया तिरस्कारें। निंदेसि प्रवर्ते आदरें ।देहाभिमानें हुंबरे। जाणपणें |
| ०५.०३.०८५ | क्षुधा तृष्णा आवरेना। निद्रा सहसा धरेना ।कुटुंबचिंता वोसरेना। भ्रांति पडिली |
| ०५.०३.०८६ | शाब्दिक बोले उदंड वाचा। लेश नाहीं वैराग्याचा ।अनुताप धारिष्ट साधनाचा। मार्ग न धरी |
| ०५.०३.०८७ | भक्ति विरक्ती ना शांती। सद्वृत्ति लीनता ना दांती ।कृपा दया ना तृप्ती। सुबुद्धि असेच ना |
| ०५.०३.०८८ | कायाक्लेसीं शेरीरहीन। धर्मविषईं परम कृपण ।क्रिया पालटेना कठिण। हृदये जयाचें |
| ०५.०३.०८९ | आर्जव नाहीं जनासी। जो अप्रिये सज्जनासी ।जयाचे जिवीं आहिर्णेसीं। परन्यून वसे |
| ०५.०३.०९० | सदा सर्वकाळ लटिका। बोले माईक लापणिका ।क्रिया विचार पाहतां येका। वचनीं सत्य नाहीं |
| ०५.०३.०९१ | परपीडेविषईं तत्पर। जैसे विंचु आणि विखार ।तैसा कुशब्दें जिव्हार। भेदी सकळांचें |
| ०५.०३.०९२ | आपले झांकी अवगुण। पुढिलांस बोले कठिण ।मिथ्या गुणदोषेंविण। गुणदोष लावी |
| ०५.०३.०९३ | स्वयें पापात्मा अंतरीं। पुढिलांचि कणव न करी ।जैसा हिंसक दुराचारी। परदु:खें शिणेना |
| ०५.०३.०९४ | दु:ख पराव्याचें नेणती। दुर्जन गांजिले चि गांजिती ।श्रम पावतां आनंदती। आपुले मनीं |
| ०५.०३.०९५ | स्वदु:खें झुरे अंतरीं। आणी परदु:खें हास्य करी ।तयास प्राप्त येमपुरी। राजदूत ताडिती |
| ०५.०३.०९६ | असो ऐसे मदांध बापुडे । तयांसि भगवंत कैंचा जोडे ।जयांस सुबुद्धि नावडे। पूर्वपातकेंकरूनी |
| ०५.०३.०९७ | तयास देहाचा अंतीं। गात्रें क्षीणता पावती ।जिवलगें वोसंडिती। जाणवेल तेव्हां |

| | |
|---|---|
| ०५.०३.०९८ | असो ऐसे गुणावेगळे। ते सच्छिष्य आगळे ।दृढ भावार्थे सोहळे। भोगिती स्वानंदाचे |
| ०५.०३.०९९ | जये स्थळीं विकल्प जागे। कुळाभिमान पाठीं लागे ।ते प्राणी प्रपंचसंगें। हिंपुटी होती |
| ०५.०३.१०० | जेणेंकरितां दुःख जालें। तें चि मनीं दृढ धरिलें ।तेणें गुणें प्राप्त जालें। पुन्हा दुःख |
| ०५.०३.१०१ | संसारसंगें सुख जालें। ऐसें देखिलें ना ऐकिलें ।ऐसें जाणोन अनहित केलें। ते दुःखी होती स्वयें |
| ०५.०३.१०२ | संसारीं सुख मानिती। ते प्राणी मूढमती ।जाणोन डोळे झांकिती। पढतमूर्ख |
| ०५.०३.१०३ | प्रपंच सुखें करावा। परी कांहीं परमार्थ वाढवावा ।परमार्थ अवघाचि बुडवावा। हें विहित नव्हे |
| ०५.०३.१०४ | मागां जालें निरूपण। गुरुशिष्यांची वोळखण ।आतां उपदेशाचें लक्षण। सांगिजेल |
| ०५.०४.००१ | ऐका उपदेशाचीं लक्षणें। बहुविधें कोण कोणें ।सांगतां तें असाधारणें। परी कांहीं येक सांगों |
| ०५.०४.००२ | बहुत मंत्र उपदेशिती। कोणी नाम मात्र सांगती ।येक ते जप करविती। वोंकाराचा |
| ०५.०४.००३ | शिवमंत्र भवानीमंत्र। विष्णुमंत्र माहालक्ष्मीमंत्र ।अवधूतमंत्र गणेशमंत्र। मार्तंडमंत्र सांगती |
| ०५.०४.००४ | मछकूर्मवऱ्हावमंत्र। नृसिंहमंत्र वामनमंत्र ।भार्गवमंत्र रघुनाथमंत्र। कृष्णमंत्र सांगती |
| ०५.०४.००५ | भैरवमंत्र मल्लारिमंत्र। हनुमंतमंत्र येक्षिणीमंत्र ।नारायेणमंत्र पांडुरंगमंत्र। अघोरमंत्र सांगती |
| ०५.०४.००६ | शेषमंत्र गरुडमंत्र। वायोमंत्र वेताळमंत्र ।झोटिंगमंत्र बहुधा मंत्र। किती म्हणौनि सांगावे |
| ०५.०४.००७ | बाळामंत्र बगुळामंत्र। काळिमंत्र कंकाळिमंत्र ।बटुकमंत्र नाना मंत्र। नाना शक्तींचे |
| ०५.०४.००८ | पृथकाकारें स्वतंत्र। जितुके देव तितुके मंत्र ।सोपे अवघड विचित्र। खेचर दारुण बीजाचे |
| ०५.०४.००९ | पाहों जातां पृथ्वीवरी। देवांची गणना कोण करी ।तितुके मंत्र वैखरी। किती म्हणौनि वदवावी |
| ०५.०४.०१० | असंख्यात मंत्रमाळा। येकाहूनि येक आगळा ।विचित्र मायेची कळा। कोण जाणे |
| ०५.०४.०११ | कित्येक मंत्रीं भूतें जाती। कित्येक मंत्रीं वेथा नासती ।कित्येक मंत्रीं उतरती। सितें विंचू विखार |
| ०५.०४.०१२ | ऐसे नाना परीचे मंत्री। उपदेशिती कर्णपात्रीं ।जप ध्यान पूजा यंत्री। विधानयुक्त सांगती |
| ०५.०४.०१३ | येक शिव शिव सांगती। । येक हरि हरि म्हणविती ।येक उपदेशिती। विठल विठल म्हणोनी |
| ०५.०४.०१४ | येक सांगती कृष्ण कृष्ण। येक सांगती विष्ण विष्ण ।येक नारायण नारायण। म्हणौन उपदेशिती |
| ०५.०४.०१५ | येक म्हणती अच्युत अच्युत। येक म्हणती अनंत अनंत ।येक सांगती दत्त दत्त। म्हणत जावें |
| ०५.०४.०१६ | येक सांगती राम राम। येक सांगती ॐ ॐम ।येक म्हणती मेघशाम। बहुतां नामीं स्मरावा |
| ०५.०४.०१७ | येक सांगती गुरु गुरु। येक म्हणती परमेश्वरु ।येक म्हणती विघ्नहरु। चिंतीत जावा |
| ०५.०४.०१८ | येक सांगती शामराज। येक सांगती गरुडध्वज ।येक सांगती अधोक्षज। म्हणत जावें |

| | |
|---|---|
| ०५.०४.०१९ | येक सांगती देव देव। येक म्हणती केशव केशव ।येक म्हणती भार्गव भार्गव। म्हणत जावें |
| ०५.०४.०२० | येक विश्वनाथ म्हणविती। येक मल्लारि सांगती ।येक ते जप करविती। तुकाई तुकाई म्हणौनी |
| ०५.०४.०२१ | हें किती म्हणौनि सांगावें। शिवशक्तीचीं अनंत नांवें ।इछेसारिखीं स्वभावें। उपदेशिती |
| ०५.०४.०२२ | येक सांगती मुद्रा च्यारी। खेचरी भूचरी चाचरी अगोचरी ।येक आसनें परोपरी। उपदेशिती |
| ०५.०४.०२३ | येक दाखविती देखणी। येक अनुहातध्वनी ।येक गुरु पिंडज्ञानी। पिंडज्ञान सांगती |
| ०५.०४.०२४ | येक सांगती कर्ममार्ग। येक उपासनामार्ग ।येक सांगती अष्टांग योग। नाना चक्रें |
| ०५.०४.०२५ | येक तपें सांगती। येक अजपा निरोपिती ।येक तत्वें विस्तारिती । तत्वज्ञानी |
| ०५.०४.०२६ | येक सांगती सगुण। येक निरोपिती निर्गुण ।येक उपदेशिती तीर्थाटण। फिरावें म्हणूनी |
| ०५.०४.०२७ | येक महावाक्यें सांगती। त्यांचा जप करावा म्हणती ।येक उपदेश करिती। सर्व ब्रह्म म्हणोनि |
| ०५.०४.०२८ | येक शाक्तमार्ग सांगती। येक मुक्तमार्ग प्रतिष्ठिती ।येक इंद्रियें पूजन करविती। येका भावें |
| ०५.०४.०२९ | येक सांगती वशीकर्ण। स्तंबन मोहन उच्चाटण ।नाना चेटकें आपण। स्वयें निरोपिती |
| ०५.०४.०३० | ऐसी उपदेशांची स्थिती। पुरे आतां सांगों किती ।ऐसे हे उपदेश असती। असंख्यात |
| ०५.०४.०३१ | ऐसे उपदेश अनेक। परी ज्ञानेविण निरार्थक ।येविषईं असे येक। भगवद्वचन |
| श्लोक ०५.०४.०१ | नानाशास्त्रं पठेल्लोको नानादैवतपूजनम् ।आत्मज्ञानं विना पार्थ सर्वकर्म निरर्थकम् |
| श्लोक ०५.०४.०२ | शैवशाक्तागमाद्या ये अन्ये च बहवो मताः ।अपभ्रंशसमास्तेऽपि जीवानां भ्रांतचेतसाम् |
| श्लोक ०५.०४.०३ | न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिदमुत्तमम् |
| ०५.०४.०३२ | याकारणें ज्ञाना समान। पवित्र उत्तम न दिसे अन्न ।म्हणौन आधीं आत्मज्ञान। साधिलें पाहिजे |
| ०५.०४.०३३ | सकळ उपदेशीं विशेष। आत्मज्ञानाचा उपदेश ।येविषईं जगदीश। बहुतां ठाईं बोलिला |
| श्लोक ०५.०४.०४ | यस्य कस्य च वर्णस्य ज्ञानं देहे प्रतिष्ठितम् ।तस्य दासस्य दासोहं भवे जन्मनि जन्मनि |
| ०५.०४.०३४ | आत्मज्ञानाचा महिमा। नेणे चतुर्मुख ब्रह्मा ।प्राणी बापुडा जीवात्मा। काये जाणे |
| ०५.०४.०३५ | सकळ तीर्थांची संगती। स्नानदानाची फळश्रुती ।त्याहूनि ज्ञानाची स्थिती। विशेष कोटिगुणें |
| श्लोक ०५.०४.०५ | पृथिव्यां यानि तीर्थानि स्नानदानेषु यत्फलम् ।तत्फलं कोटिगुणितं ब्रह्मज्ञानसमोपमन् |
| ०५.०४.०३६ | म्हणौनि जें आत्मज्ञान। तें गहनाहूनि गहन ।ऐक तयाचें लक्षण। सांगिजेल |
| ०५.०५.००१ | जव तें ज्ञान नाहीं प्रांजळ। तव सर्व कांहीं निर्फळ ।ज्ञानरहित तळमळ। जाणार नाहीं |
| ०५.०५.००२ | ज्ञान म्हणतां वाटे भरम। काये रे बा असेल वर्म ।म्हणौनि हा अनुक्रम। सांगिजेल आतां |

| | |
|---|---|
| ०५.०५.००३ | भूत भविष्य वर्तमान। ठाऊकें आहे परिछिन्न ।यासी हि म्हणिजेत ज्ञान। परी तें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.००४ | बहुत केलें विद्यापठण। संगीतशास्त्र रागज्ञान ।वैदिक शास्त्र वेदाधेन। हें हि ज्ञान नव्हे |
| ०५.०५.००५ | नाना वेवसायाचें ज्ञान। नाना दिक्षेचें ज्ञान ।नाना परीक्षेचें ज्ञान। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.००६ | नाना वनितांची परीक्षा। नाना मनुष्यांची परीक्षा ।नाना नरांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.००७ | नाना अश्वांची परीक्षा। नाना गजांची परीक्षा ।नाना स्वापदांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.००८ | नाना पशूंची परीक्षा। नाना पक्षांची परीक्षा ।नाना भूतांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.००९ | नाना यानांची परीक्षा। नाना वस्त्रांची परीक्षा ।नाना शस्त्रांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०१० | नाना धातूंची परीक्षा। नाना नाण्यांची परीक्षा ।नाना रत्नांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०११ | नाना पाषाणपरीक्षा। नाना काष्ठांची परीक्षा ।नाना वाद्यांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०१२ | नाना भूमींची परीक्षा। नाना जळांची परीक्षा ।नाना सतेज परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०१३ | नाना रसांची परीक्षा। नाना बीजांची परीक्षा ।नाना अंकुरपरीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०१४ | नाना पुष्पांची परीक्षा। नाना फळांची परीक्षा ।नाना वल्लींची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०१५ | नाना दुःखांची परीक्षा। नाना रोगांची परीक्षा ।नाना चिन्हांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०१६ | नाना मंत्रांची परीक्षा। नाना यंत्रांची परीक्षा ।नाना मूर्तींची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०१७ | नाना क्षत्रांची परीक्षा। नाना गृहांची परीक्षा ।नाना पात्रांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०१८ | नाना होणार परीक्षा। नाना समयांची परीक्षा ।नाना तर्कांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०१९ | नाना अनुमानपरीक्षा। नाना नेमस्त परीक्षा ।नाना प्रकार परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०२० | नाना विद्येची परीक्षा। नाना कळेची परीक्षा ।नाना चातुर्यपरीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०२१ | नाना शब्दांची परीक्षा। नाना अर्थांची परीक्षा ।नाना भाषांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०२२ | नाना स्वरांची परीक्षा। नाना वर्णांची परीक्षा ।नाना लेखनपरीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०२३ | नाना मतांची परीक्षा। नाना ज्ञानांची परीक्षा ।नाना वृत्तींची परीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०२४ | नाना रूपांची परीक्षा। नाना रसनेची परीक्षा ।नाना सुगंधपरीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०२५ | नाना सृष्टींची परीक्षा। नाना विस्तारपरीक्षा ।नाना पदार्थपरीक्षा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०२६ | नेमकचि बोलणें। तत्काळचि प्रतिवचन देणें ।सीघ्रचि कवित्व करणें। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०२७ | नेत्रपालवी नादकळा। करपालवी भेदकळा ।स्वरपालवी संकेतकळा। हें ज्ञान नव्हे |

| | |
|---|---|
| ०५.०५.०२८ | काव्यकुशळ संगीतकळा। गीतप्रबंद नृत्यकळा ।सभाच्यातुर्य शब्दकळा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०२९ | वाग्विळास मोहनकळा। रम्य रसाळ गायनकळा ।हास्य विनोद कामकळा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०३० | नाना लाघवें चित्रकळा। नाना वाद्यें संगीतकळा ।नाना प्रकारें विचित्र कळा। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०३१ | आदिकरूनि चौसष्टि कळा। याहि वेगळ्या नाना कळा ।चौदा विद्या सिद्धि सकळां। हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०३२ | असो सकळ कळाप्रवीण। विद्यामात्र परिपूर्ण ।तरी ते कौशल्यता परी ज्ञान । म्हणों चि नये |
| ०५.०५.०३३ | हें ज्ञान होयेसें भासे। परंतु मुख्य ज्ञान तें अनारिसें ।जेथें प्रकृतीचें पिसें। समूळ वाव |
| ०५.०५.०३४ | जाणावें दुसऱ्याचें जीवीचें। हें ज्ञान वाटे साचें ।परंतु हें आत्मज्ञानाचें। लक्षण नव्हे |
| ०५.०५.०३५ | माहानुभाव माहाभला। मानसपूजा करितां चुकला ।कोणी येकें पाचारिला। ऐसें नव्हे म्हणोनी |
| ०५.०५.०३६ | ऐसी जाणे अंतरस्थिती। तयासि परम ज्ञाता म्हणती ।परंतु जेणें मोक्षप्राप्ती। तें हें ज्ञान नव्हे |
| ०५.०५.०३७ | बहुत प्रकारीचीं ज्ञानें। सांगों जातां असाधारणें । सायोज्यप्राप्ति होये जेणें। तें ज्ञान वेगळें |
| ०५.०५.०३८ | तरी तें कैसें आहे ज्ञान। समाधानाचें लक्षण ।ऐसें हें विशद करून। मज निरोपावें |
| ०५.०५.०३९ | ऐसें शुद्ध ज्ञान पुसिलें। तें पुढिले समासीं निरोपिलें ।श्रोतां अवधान दिधलें। पाहिजे पुढें |
| ०५.०६.००१ | ऐक ज्ञानाचें लक्षण। ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान ।पाहावें आपणासि आपण। या नाव ज्ञान |
| ०५.०६.००२ | मुख्य देवास जाणावें। सत्य स्वरूप वोळखावें ।नित्यानित्य विचारावें। या नाव ज्ञान |
| ०५.०६.००३ | जेथें दृश्य प्रकृति सरे। पंचभूतिक वोसरे ।समूळ द्वैत निवारे। या नाव ज्ञान |
| ०५.०६.००४ | मनबुद्धिअगोचर। न चले तर्काचा विचार ।उल्लेख परेहूनि पर। या नाव ज्ञान |
| ०५.०६.००५ | जेथें नाहीं दृश्यभान। जेथें जाणीव हें अज्ञान ।विमळ शुद्ध स्वरूपज्ञान। यासि बोलिजे |
| ०५.०६.००६ | सर्वसाक्षी अवस्ता तुर्या। ज्ञान ऐसें म्हणती तया ।परी तें जाणिजे वायां। पदार्थज्ञान |
| ०५.०६.००७ | दृश्य पदार्थ जाणिजे। त्यास पदार्थज्ञान बोलिजे ।शुद्ध स्वरूप जाणिजे। या नाव स्वरूपज्ञान |
| ०५.०६.००८ | जेथें सर्वचि नाहीं ठाईंचें। तेथें सर्वसाक्षत्व कैंचें ।म्हणौनि शुद्ध ज्ञान तुर्येचें। मानूंचि नये |
| ०५.०६.००९ | ज्ञान म्हणिजे अद्वैत। तुर्या प्रत्यक्ष द्वैत ।म्हणौनि शुद्ध ज्ञान सतंत। वेगळेंचि असे |
| ०५.०६.०१० | ऐक शुद्ध ज्ञानाचें लक्षण। शुद्ध स्वरूपचि आपण ।या नाव शुद्ध स्वरूपज्ञान। जाणिजे श्रोतीं |
| ०५.०६.०११ | माहांवाक्य उपदेश भला। परी त्याचा जप नाहीं बोलिला ।तेथीचा तो विचारचि केला। पाहिजे साधकें |
| ०५.०६.०१२ | माहांवाक्य उपदेशसार। परी घेतला पाहिजे विचार ।त्याच्या जपें अंधकार । न फिटे भ्रांतीचा |
| ०५.०६.०१३ | माहावाक्याचा अर्थ घेतां। आपण वस्तुचि तत्वतां ।त्याचा जप करितां वृथा। सीणचि होये |

| ०५.०६.०१४ | माहावाक्याचे विवरण। हें मुख्य ज्ञानाचें लक्षण ।शुद्ध लक्ष्यांशे आपण। वस्तुच आहे |
|---|---|
| ०५.०६.०१५ | आपला आपणासि लाभ। हें ज्ञान परम दुल्लभ ।जें आदिअंतीं स्वयंभ। स्वरूपचि स्वयें |
| ०५.०६.०१६ | जेथून हें सर्व ही प्रगटे। आणि सकळ ही जेथें आटे ।तें ज्ञान जालियां फिटे। भ्रांति बंधनाची |
| ०५.०६.०१७ | मतें आणी मतांतरें। जेथें होतीं निर्विकारें ।अति सूक्ष्म विचारें। पाहातां ऐक्य |
| ०५.०६.०१८ | जें या चराचराचें मूळ। शुद्ध स्वरूप निर्मळ ।या नाव ज्ञान केवळ। वेदांतमतें |
| ०५.०६.०१९ | शोधितां आपलें मूळ स्थान। सहजचि उडे अज्ञान ।या नाव म्हणिजे ब्रह्मज्ञान। मोक्षदायेक |
| ०५.०६.०२० | आपणासि वोळखों जातां। आंगीं बाणे सर्वज्ञता ।तेणें येकदेसी वार्ता। निशेष उडे |
| ०५.०६.०२१ | मी कोण ऐसा हेत । धरून पाहातां देहातीत ।आवलोकितां नेमस्त। स्वरूपचि होये |
| ०५.०६.०२२ | असो पूर्वीं थोर थोर। जेणें ज्ञानें पैलपार ।पावले ते साचार। ऐक आतां |
| ०५.०६.०२३ | व्यास वसिष्ठ माहामुनी। शुक नारद समाधानी ।जनकादिक माहांज्ञानी। येणेंचि ज्ञानें |
| ०५.०६.०२४ | वामदेवादिक योगेश्वर। वाल्मीक अत्रि ऋषेश्वर ।शोनिकादि अध्यात्मसार। वेदांतमतें |
| ०५.०६.०२५ | सनकादिक मुख्यकरूनी। आदिनाथ मीन गोरक्षमुनी ।आणीक बोलतां वचनीं। अगाध असती |
| ०५.०६.०२६ | सिद्ध मुनी माहानुभाव। सकळांचा जो अंतर्भाव ।जेणें सुखें माहादेव। डुल्लत सदा |
| ०५.०६.०२७ | जें वेदशास्त्रांचें सार। सिद्धांतधादांतविचार ।ज्याची प्राप्ती भाग्यानुसार। भाविकांस होये |
| ०५.०६.०२८ | साधु संत आणी सज्जन। भूत भविष्य वर्तमान ।सर्वत्रांचें गुह्य ज्ञान। तें संगिजेल आतां |
| ०५.०६.०२९ | तीर्थें व्रतें तपें दानें। जें न जोडे धूम्रपानें ।पंचाग्नी गोरांजनें। जें प्राप्त नव्हे |
| ०५.०६.०३० | सकळ साधनाचें फळ। ज्ञानाची सिगचि केवळ ।जेणें संशयाचें मूळ। निशेष तुटे |
| ०५.०६.०३१ | छपन्न भाषा तितुके ग्रंथ। आदिकरून वेदांत ।या इतुकियांचा गहनार्थ। येकचि आहे |
| ०५.०६.०३२ | जें नेणवे पुराणीं। जेथें सिणल्या वेदवाणी ।तेंचि आतां येचि क्षणीं। बोधीन गुरुकृपें |
| ०५.०६.०३३ | पाहिलें नस्तां संस्कृतीं। रीग नाहीं मऱ्हाष्ट ग्रंथीं ।हृदईं वसल्यां कृपामूर्ती। सद्गुरुस्वामी |
| ०५.०६.०३४ | आतां नलगे संस्कृत। अथवा ग्रंथ प्राकृत ।माझा स्वामी कृपेसहित। हृदईं वसे |
| ०५.०६.०३५ | न करितां वेदाभ्यास। अथवा श्रवणसायास ।प्रेत्नेंविण सौरस। सद्गुरुकृपा |
| ०५.०६.०३६ | ग्रंथ मात्र मऱ्हाष्ट। त्याहून संस्कृत श्रेष्ठ ।त्या संस्कृतामधें पष्ट। थोर तो वेदांत |
| ०५.०६.०३७ | त्या वेदांतापरतें कांहीं। सर्वथा श्रेष्ठ नाहीं ।जेथें वेदगर्भ सर्व ही। प्रगट जाला |
| ०५.०६.०३८ | असो ऐसा जो वेदांत। त्या वेदांताचा हि मथितार्थ ।अतिगहन जो परमार्थ। तो तूं ऐक आतां |

| | |
|---|---|
| ०५.०६.०३९ | अरे गहनाचें ही गहन। तें तूं जाण सद्गुरुवचन ।सद्गुरुवचनें समाधान। नेमस्त आहे |
| ०५.०६.०४० | सद्गुरुवचन तोचि वेदांत। सद्गुरुवचन तोचि सिद्धांत ।सद्गुरुवचन तोचि धादांत। सप्रचीत आतां |
| ०५.०६.०४१ | जें अत्यंत गहन। माझ्या स्वामीचें वचन ।जेणें माझें समाधान। अत्यंत जालें |
| ०५.०६.०४२ | तें हें माझें जीवीचें गुज। मी सांगैन म्हणतों तुज ।जरी अवधान देसीं मज। तरी आतां ये च क्षणीं |
| ०५.०६.०४३ | शिष्य म्लान्वदनें बोले। धरिले सदृढ पाउलें ।मग बोलों आरंभिलें। गुरुदेवें |
| ०५.०६.०४४ | अहं ब्रह्मास्मि माहांवाक्य। येथीचा अर्थ अतर्क्ये।तो ही सांगतों ऐक्य । गुरुशिष्य जेथें |
| ०५.०६.०४५ | ऐक शिष्या येथीचें वर्म। स्वयें तूंचि आहेसि ब्रह्म ।ये विषईं संदेह भ्रम। धरूंचि नको |
| ०५.०६.०४६ | नवविधा प्रकारें भजन। त्यांत मुख्य तें आत्मनिवेदन ।तें समग्र प्रकारें कथन। कीजेल आतां |
| ०५.०६.०४७ | निर्माण पंचभूतें यीयें। कल्पांतीं नासती येथान्वयें ।प्रकृति पुरुष जीयें। ते ही ब्रह्म होती |
| ०५.०६.०४८ | दृश्य पदार्थ आटतां। आपणहि नुरे तत्वतां ।ऐक्यरूपें ऐक्यता। मुळींच आहे |
| ०५.०६.०४९ | सृष्टीची नाहीं वार्ता। तेथें मुळींच ऐक्यता ।पिंड ब्रह्मांड पाहों जातां। दिसेल कोठें |
| ०५.०६.०५० | ज्ञानवन्ही प्रगटे। तेणें दृश्य केर आटे ।तदाकारें मूळ तुटे। भिन्नत्वाचें |
| ०५.०६.०५१ | मिथ्यत्वें वृत्ति फिरे। तों दृश्य असतांच वोसरे ।सहजचि येणें प्रकारें। जालें आत्मनिवेदन |
| ०५.०६.०५२ | असो गुरूचे ठाईं अनन्यता। तरी तुज कायेसी रे चिंता ।वेगळेंपणें अभक्ता। उरोंचि नको |
| ०५.०६.०५३ | आतां हेंचि दृढीकर्ण । व्हावया करी सद्गुरुभजन ।सद्गुरुभजनें समाधान। नेमस्त आहे |
| ०५.०६.०५४ | या नांव शिष्या आत्मज्ञान। येणें पाविजे समाधान ।भवभयाचें बंधन। समूळ मिथ्या |
| ०५.०६.०५५ | देह मी वाटे ज्या नरा। तो जाणावा आत्महत्यारा ।देहाभिमानें येरझारा। भोगिल्याच भोगी |
| ०५.०६.०५६ | असो चहूं देहावेगळा। जन्मकर्मासी निराळा ।सकळ आबाळगोबळा। सबाह्य तूं |
| ०५.०६.०५७ | कोणासीच नाहीं बंधन। भ्रांतिस्तव भुलले जन ।दृढ घेतला देहाभिमान। म्हणौनियां |
| ०५.०६.०५८ | शिष्या येकांतीं बैसावें। स्वरूपीं विश्रांतीस जावें ।तेणें गुणें दृढावे। परमार्थ हा |
| ०५.०६.०५९ | अखंड घडे श्रवण मनन। तरीच पाविजे समाधान ।पूर्ण जालियां ब्रह्मज्ञान। वैराग्य भरे आंगीं |
| ०५.०६.०६० | शिष्या मुक्तपणें अनर्गळ। करिसीं इंद्रियें बाष्कळ ।तेणें तुझी तळमळ। जाणार नाहीं |
| ०५.०६.०६१ | विषईं वैराग्य उपजलें। तयासीच पूर्ण ज्ञान जालें ।मणी टाकितांचि लाधलें। राज्य जेवीं |
| ०५.०६.०६२ | मणी होता सीगटाचा। लोभ धरूनियां तयाचा ।मूर्खपणें राज्याचा। अव्हेर केला |
| ०५.०६.०६३ | ऐक शिष्या सावधान। आतां भविष्य मी सांगेन ।जया पुरुषास जें ध्यान। तयासि तेंचि प्राप्त |

